







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

साहित्य-कला-संगीत

डिसेंबर
१९६४

वर्ष २० वें

मूल्य १ रु.




## श्रेयनामावली



दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : Dalalart

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत ३ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. * प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनडी ब्रीज, मुंबई ४,
टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# आम्हीही हें करूं शकतो—

**जीवन** ही एक क्रीडा आहे. क्रीडा ही क्रीडेच्या दृष्टिकोनांतून, क्रीडेसाठीं क्रीडेचा आनंद घेत घेत आणि इतर खेळणाऱ्या (व पाहणाऱ्याही) मंडळींना देत देतच खेळली गेली पाहिजे. क्रीडेचा आनंद जय पराजयाच्या विचारानें डागळून टाकणाऱ्यांना आपण 'रडीचा डाव' खेळणारे म्हणून संबोधतो – अगदीं न कळत्या वा कम कळत्या वयांतही क्रीडा क्रीडेच्या भूमिकेवरून न करणारांना आपण 'रडे' म्हणत आलो आहोंत. जय पराजय ही कुठल्याही क्रीडेंतली एक अपरिहार्य गोष्ट आहे. कुणींतरी जिंकण्यासाठीं कुणाला तरी हरावेंच लागतें. आणि कुणाचा तरी जय व्हावा वा पराजय व्हावा म्हणून क्रीडा ही करावीच लागते. पण ती सर्व क्रिया क्रीडेचें तत्त्व वाणून घेऊन घडली तर असले जय पराजय पचवूनही माणसें आनंदी होतात, त्यांना तृप्ति लाभते. मनोगंडांतून क्रीडेचा आनंद मिळत नाहीं. जो पराभवाला भितो त्याला विजयाचा हिमालय कधीं स्वप्नांतही दिसणार नाहीं. फार मोठा पराक्रम घडण्यासाठीं त्या पराक्रमाची फार मोठीं स्वप्नें पाहण्याची ताकद लागते. ती ताकद येते निष्ठेंतून, श्रद्धेंतून, विजयाच्या कांक्षेंतून !

आमच्या हॉकी संघाच्या कप्तानाला हीं स्वप्नें पडलीं. त्यानें तीं पेललीं. येऊं तर विजय घेऊनच ह्या ईर्षेनें माणसें हॉकीचा खेळ खेळलीं. क्रीडेचा आनंद त्यांनीं तेथल्या असंख्य प्रेक्षकांना दिला आणि विजयाचा आनंद त्यांनीं मिळवून आणला. हॉकींतलं अजिंक्यपद ही तशी महत्त्वाचीच गोष्ट होती. पण त्याहून मोठी जिद्द ! पराक्रमाची, कर्तृत्वाची, कांहींतरी मोठं करून दाखविण्याची ! गेलेलें अजिंक्यपद मिळवून मग निवृत्त होईन ही प्रतिज्ञा करून कप्तान गेला आणि ते पटकावून परत आला.

क्रिकेटच्या इतिहासांतही असेंच एक सीमोल्लंघन घडलें — त्या दिवसाची साक्ष ठेवून घडलें ! मनोगंड, भीतिगंड हा आपल्या एकूण राष्ट्रजीवनाला जडलेलाच शाप आहे – क्रीडाक्षेत्रांतही ह्या भावनेनें आपले खेळाडू नेहमीं संरक्षक (Defensive) खेळ खेळण्यांत तृप्ति मानीत असत. दोन्हीं बाजू चेंडू अडवून झुंजत ठेवणें येवढेंच त्यांना काम झालें ! त्यामुळें विजय तर कधीं आलाच नाहीं. पण क्रीडेचा आनंद मात्र आमचे खेळाडू देई – घेईनासे झाले. पतौडीच्या नेतृत्वानें एक नवा इतिहास उभा केला आहे. आक्रमक खेळ हें ऑस्ट्रेलियन्सचें वैशिष्ट्य ! पतौडीच्या नेतृत्वानें आम्हांला तोच खेळ दिला आहे. ती दृष्टि दिली आहे. त्या खेळांतूनच वैयक्तिक पटुता (Individual valour) शिगेला पोंहचली व सी. के., सी. एस्., अमरसिंग – निसार ह्यांचे काळांत आपल्याला नेऊन बसविलें. पतौडी, चंद्रशेखर, बोर्डे, दुराणी, नाडकर्णी, मांजरेकर, सरदेसाई – बापरे ! कितीतरी मोठी माणसें आणि त्यांना मोठे करणारा, त्यांची जिद्द पेटवणारा पतौडीही मोठा ! माणसांपेक्षां ह्या नव्या वृत्तीचे, जिद्दीचे, बदलाचे आम्ही स्वागत करतो. कारण Offensive is best defensive हें तत्त्व शिकणें (सर्वच क्षेत्रांत) आवश्यक होतें. आणि क्रिकेटच्या क्षेत्रांत आम्ही हा आक्रमक पवित्रा घेतला म्हणूनच विजयश्री खेचून आणूं शकलों. ह्या तीन्हीं सामन्यांत आम्ही सामने वांचविण्यासाठीं खेळलों नाहीं. तर खेळाच्या आनंदासाठीं खेळलों. ह्या नव्या व इष्ट बदलाचें आम्ही स्वागत करतों.

खेळासाठीं खेळा, विजयासाठींही खेळा, आक्रमक पवित्रे घेऊन खेळा. पण मनापासून खेळा. कारण ह्या क्रीडेंतूनच जीवनाच्या निर्भेळ आनंदाची निर्मिती होत असते.

लौकिक यशापयशापेक्षां ही आत्मविश्वासाची कमाई फार मोठी आहे. नवजीवन देणारी आहे.

**—संपादक**








## तुम्हांला हें परवडते तरी कसे ?

स.॰न. वि. वि.

आपला सर्वांगसुंदर दिवाळी अंक वाचला. सतरा कथा, दोन विनोदी लेख, एक धमाल विनोंदी एकांकिका, सहा लेख, अकरा कविता येवढा प्रचंड वाचनीय मजकूर; शिवाय सहा बहुरंगी उत्तम कलाकृति, तीन विंग चित्रमाला, दहावीस व्यंगचित्रें येवढा सारा मजकूर तुम्ही तीन रुपये किंमतीच्या दोनशेंवीस पानी अंकांत दिला आहे हें पाहून मन अक्षरशः थक्क होतें. अलिकडे इतर दिवाळी अंकांत पानें कमी, चित्रें कमी, बिगचित्र मालिका नाहींच असें असूनही किंमत मात्र तीन रुपये वसूल केली जाते. आपण मात्र तीन रुपयांत इतका भरीव, आकर्षक व संग्राह्य अंक कसा काय देऊं शकता ? हे दिवाळी अंक म्हणजे कधींकधीं लूट वाटते लूट ! आम्ही सामान्य वाचक मोठ्या आशाभूतपणानें चांगल्या दिवाळी अंकांची वाट पाहतो. पण पैसे घालवून मग ध्यानीं येते कीं, लूट झाली आहे आपली !

आपलें खरोखरच कौतुक वाटते. तुम्हांला कसें काय परवडते तें तरी सांगा कीं आम्हांला (खरं म्हणजे इतरांनाच).

उत्तराची (अर्थातच जाहीर) अपेक्षा करतो.

आपला,

गोरेगांव **वसंत फातरफेकर**

(आमच्यावरील आपल्या विश्वासाची खात्री असल्यामुळेंच हें शक्य होते. —**संपादक**)

✩

## श्रेष्ठ कला ! थोर परंपरा

स. न. वि. वि.

'दीपावली'चा विसाव्या वर्षाचा दिवाळी अंक नेहमीं प्रमाणेंच रोख रुपये तीन देऊन विकत घेतला. गेली वीस वर्षें मी सातत्यानें आपला दिवाळी अंक रोख मूल्य टाकून विकत घेतो आहे. आणि सांगावयास आनंद होतो कीं, गेल्या वीस वर्षांत मला एकदांही पश्चात्ताप करायची पाळी आलेली नाहीं. प्रतिभेचें वर्णन कुठेंतरी नवनवोन्मेष शालिनी




प्रज्ञा असें केलेलें वाचलें आहे. आपल्या मुखपृष्ठापासून तें आंतील विकारविलसितापर्यंतची सर्व चित्रें मी पाहिली ( आणि आधीं फाडून ठेवली. कारण आमच्या चाळींत फुकटे वाचक फार आहेत. अंकासकट चित्रें जाण्याची भीति नेहमींच संभवते) आणि आपल्या प्रतिभेबद्दलचा आदर वाढला. 'दीपावली'चे दलालांजवळ खरी प्रतिमा आहे, असें मी मित्रांना अभिमानानें सांगतो. (पुराव्यानें शाबीत करूं शकतो ना मी) आपली चित्रें, विंग माला व आकर्षक मुखपृष्ठ देऊन आपण थोर परंपरा वीस वर्षे कायम राखलींत याबद्दल मी अभिनंदन करतो (दुसरं मी काय करणार ? रोख मूल्य मी देतोच देतो.)

आपला

ठाकुरद्वार, मुंबई. **वामन रावजी बेके**

('अभिनंदन हे पांच शद्ब पुरे आहेत ? मौलिक' आहेत. धन्यवाद—**संपादक**)

✩

## वाचलाच पाहिजे असा अंक

स. न. वि. वि.

मी दीपावलीचा नियमित वाचक आहे. दिवाळी अंकांत तर आपण बादशहाच आहांत. कुणी विनोदांत बादशहा आहेत. कुणी 'खिडकी' अंक स्पेशालिस्ट आहेत. कुणी वग स्पेशल काढतात—पण एकूण बादशहा 'दीपावली'च !

प्रथम भाव्यांची 'हिमानी' वाचली. आणि सुन्न झालो. खरंच 'फुल्शा' माग्ल्या असतील कां हो ? असतील तर फार थरारक वाटतं तें ! सबनीसांची एकांकिका वाचून खदखदून हंसलो. टाइप म्हणजे साला टाईप आहे माणसांचा ! हे सारे टाइप यमाच्या तावडींतून वांचले हेच चांगलं झालं. मोरूचं कांहीं खरं नाहीं बरं का ! मागल्या अंकांतला मोरू मला आवडला होता. मोरूला टॅक्सींत घालून पळवला काय ? अरविन्द गोखले, सदानंद रेगे, मा. कृ. पारधी, चोरघडे ह्यांनी अंकाची शान राखली. बाकी कवि चित्रेंकडून गोष्ट आणि जितेंद्र अभिषेकी यांच्याकडून मैफलीऐवजी कथा काढलींत हे कसब तुमचंच हं ! लेख काय, एकांकिका काय, खूपशा कथा काय, अंक वाचला—पुन्हां एकदां वाचणार आहे. 'दीपावली' न वाचणं म्हणजे दिवाळी अंकच मुळी न वाचणं आहे. यंदा आंतली एक दोन चित्रं जरा बिघडलीं काय ? जरा खटकलें.

एरव्ही अंक झकासच !

आपला

**मुकुंदराव एस. कदम**

(यावर आम्ही काय लिहिणार ?—**संपादक**)

✩

## रसिक वाचकांचे मनःपूर्वक आभार !

**दिपावलीचा दिवाळी अंक प्रसिद्ध होतांच दोन दिवसांत सर्व संपला. मुंबईतल्या स्टॉल्सवरसुद्धां न दिसल्यानें पुष्कळांनी कार्यालयांत तक्रारीही केल्या, त्यांच्यासाठीं मुद्दाम खुलासा करीत आहोंत.**

**मोजक्याच प्रति (कागदाच्या टंचाईमुळें) काढलेल्या असल्यानें, आधी ज्यांनी ज्यांनी आपल्या ऑर्डर्स नोंदल्या होत्या त्यांनाच फक्त अंक देऊं शकलों, व तोही अपुरा पडल्यानें बऱ्याच एजंटांचा गैरसमज झाला, व त्यांना नकार द्यावा लागला, तरी क्षमस्व !**

**'दीपावली'स दिलेल्या या सक्रीय पाठिंब्याबद्दल वाचकांचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.**

**—संपादक**










# भारतांतील पट्टीचे फलंदाज



# उम्रिगर आणि मांजरेकर

अरविंद ताठके



**उम्रिगर अन् मांजरेकर हे समकालीन क्रिकेटपटु. उम्रिगर प्रथमश्रेणी सामन्यांतून निवृत्त झाले, त्या सुमारास मांजरेकरहि निवृत्त होणार असल्याची भुयका उठली होती. 'पण आपण अजून खेळणार आहोंत' अशी घोषणा करून मांजरेकरांनी ती खोटी ठरविली. या दोघांत श्रेष्ठ कोण याची चर्चा क्रिकेट प्रेमिकांत सतत पहावयास मिळतें. प्रस्तुत लेखांतहि त्यांच्या कर्तृत्वाची तुलना केली आहे. रसिकांना ती खास उद्‌बोधक वाटेल.**

**इंग्लंडचा** प्रख्यात फलंदाज पॅटसी हेंड्रेन निवृत्त झाला तेव्हां एका क्रिकेट षोकिनानें त्याला विचारलें—

"पॅटसी तूं इतक्या लौकर निवृत्त कां झालास ?"

"तूं निवृत्त कां होत नाहींस ? असें कुणी विचारूं नये म्हणून !" हेंड्रेननें लागलीच जबाब दिला.

पॉली उम्रिगर यांच्या कसोटी सामन्यांतल्या निवृत्तीची बातमी वाचल्यावर मला वरील प्रसंगाची आठवण झाली अन् मग उम्रिगर यांच्या समयज्ञतेचें कौतुकहि वाटलें. १९६२ मध्यें वेस्ट इंडिजचा दौरा त्यांनी चांगलाच गाजविला अन् मग टेस्ट सामन्यांपुरती (नंतर प्रथम-श्रेणी सामन्यांतुनहि) आपली बॅट त्यांनी म्यान केली. 'जगण्यांत आनंद आहे तोंवर मरण्यांत मौज आहे' हें गडकऱ्याचें प्रसिद्ध सुभाषित त्यांना पटलेलें दिसतें असें कां न म्हणावें ? त्याच वेळीं, मांजरेकरांनीहि टेस्ट सामन्यांना 'गुड बाय्' केल्याचें वृत्त कानांवर थडकलें. पण नंतर त्यांनी त्याचा इन्कार केल्यानें वाईट वाटलें. ते कितीहि शास्त्रशुद्ध खेळणारे असोत अथवा तंत्रनिपुणतेंत आपल्याकडे त्यांना तोड नसो. त्यांचा 'फॉर्म' आतां संपला आहे. ६२ सालच्या वेस्ट इंडिज दौऱ्यांत ही गोष्ट स्पष्ट झाली होती. पण उम्रिगरांनी योग्यवेळीं निवृत्त होण्यांत जो मोठेपणा व लोकप्रियतेला पाठ दाखविण्याचें धैर्य दाखविलें तशी कृति आमच्या विजय मांजरेकरांना दाखवितां आली नाहीं. प्रसिद्धीचा (कां पैशाचा ?) मोह त्यांना आवरतां आला नाहीं. युद्ध काळानंतर विजय मर्चंट अन् विजय हजारे या धुरंदरांनीं जशी भारतीय क्रिकेटची मान जगांत उंच केली तद्वत् त्यांच्यानंतरच्या काळांत उम्रिगर-मांजरेकरांनीहि त्यांचाच कित्ता गिरविला याबद्दल मात्र दुमत होऊं नये. भारताच्या या दोन उत्तम क्रिकेटपटूंच्या टेस्टमधल्या कर्तृत्वाचें मूल्य-मापन निःपक्षपातिपणें अन् पूर्वग्रह बाजूला ठेवून करण्याचें योजिलें आहे. उम्रिगर निवृत्त होईपर्यंतच्या काळापर्यंत ही तुलना केली आहे ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत येईलच.

उम्रिगर अन् मांजरेकर हे समकालीन क्रिकेटपटु मांजरेकर उम्रिगर





अनुक्रमणिका

## काळाबाजार ?

स. न. वि. वि.

'दीपावली' प्रसिद्ध झाला म्हणून "मराठांत" वाचलं. म्हटलं घेऊं उद्यां परवां. दिवाळीची सुटी लागली. 'दीपावली' विकत घ्यायला गेलों.स्टॉलवाला म्हणाला 'दीपावली' खलास ! मी म्हटलं "अरे काल तर प्रसिद्ध झाला." तो म्हणाला व्हय् साहेब, पर खलास झाला त्येला कोन काय करनार तुमी जरा लेट केली. मला आश्चर्य वाटलें. पण दलालसाहेब मला जरा शंका वाटते. हे पेपरवाले दिवाळी अंकाचं 'ब्लॅक मार्केट' करीत असले पाहिजेत. नाहींतर एका दिवसांत अंक खलास? तुम्ही जरा चौकशी तर करा. कुठून असे सांपडले तर निदान एखादा तरी मला पाठवाच. तुमचे पत्र आले कीं, मीच घेऊन जाईन पाहिजे तर ! नाहींतर त्या पोस्ट खात्याची भर ! बरेच दिवाळी अंक जातात म्हणे पोस्टांतच.

लवकर कळवा, वाट पाहतो.

आपला

**अजय अवसरे**

(आमचे एजंटस् चांगले आहेत. वर्षानुवर्षे त्यांचा आणि आमचा संबंध आहे. आपल्यासारख्या वाचकांचा विश्वास हेंच त्यांचे (आणि आमचेही) भांडवल असल्यानें व ते भरपूर असल्याने 'काळाबाजार' करण्याची गरजच कुठें उरते ? 'अंक खलास' हें सत्य आहे. तुम्हांला जरा 'लेटच' झाला (की नव्हे) नाहीं कां ? **–संपादक**) ☆

## दिवाळीचा आनंद द्विगुणीत करणारा अंक

स. न. वि. वि

नुकतीच दिवाळी होऊन गेली आहे. व आपले नातेवाईक, मित्रमैत्रिणी भेटून गेल्यामुळें मनें आनंदीत झाली आहेत व आपल्या "दिपावलीच्या" खास दिवाळी अंकामुळें त्यांत भरच पडली आहे. दिपावली म्हटले की एकदम त्यांतील आपण काढलेली व सुंदर रंगात छापलेली चित्रें डोळ्यापुढें येतात व ह्या अंकांतील चित्रे आपल्या दरवर्षीच्या परंपरेला शोभतील अशीच नयनरम्य आहेत.

दुसरे म्हणजे साहित्य. श्री. पु. भा. भावे यांची गोष्ट फारच आवडली दुसरें म्हणजे "मार्लीन डिट्रिच" ह्या नटीवरील सुंदर सांगोपांग लिहिलेला लेख. तो वाचून कांहीं जुन्या स्मृती उजाळून निघाल्या व कॉलेज लाईफची आठवण झाली. अशा रितीने आपण जो सर्वांग परिपूर्ण अंक काढला आहे यावद्दल मी आपले अभिनंदन करतो

मार्वे रोड, मालाड, आपला

मुंबई ६४ **वसंत पनवेलकर** ☆

## दर्जेदार अंक

स. न. वि. वि.

दीपावलीचा दिवाळी अंक दर्जेदार आहे. अभिनंदन. वैषयिक विषयांपासून दूर राहून आपण प्रवाहाच्या विरुद्ध पोहण्याचे कसब दाखविले आहे. रेषे व चित्रे ह्यांचे लेख मात्र अंकाच्या यशास गालबोट लावल्यासारखे वाटतात ! ! अंतःमनाचे पापुद्रे . . मनोविश्लेषण . . . लैंगिक सब्लीमेशन . . . भावनिक गुंतवळा . . . असं कांहीं तरी हवच ! खरे नां ?

कविता विभाग मनांत भरत नाहीं . . 'कळ' फार सुंदर.

दौलतगंज, लश्कर **श्री. वा. काळवीट** ☆

## बिंगमालांवर खूष

स. न. वि. वि.

तुमची ती "पंक्चरलेली मनोराज्यें" आणि "जिंकू किंवा मरूं" ही बिंगमाला फार आवडली. त्यांतल्या त्यांत जयप्रकाश नारायण, गोवा, कैरो, शेख अब्दुल्ला आणि कम्युनिस्ट ह्यांच्यावरची चित्रें म्हणजे तर भलतीच धमाल ! मार्मिक चित्रें वाटली सारीं. त्यांतली सूचकता मला भारी आवडली. विशाल जोडचा पाहतांना तर पोट धरून हसलो, भाव्यांचा 'कित्ता' गाडगीळांचे तें जाड भिंग, फडक्यांच्या कुबड्या–वाहवा ! आणि जिंकू किंवा मरूं ही बिंगमाला मिळवून तर तुम्ही चांगली भर घातली आहे. 'दीपावली'च्या कीर्तीला साजेशी बिंगमाला देऊन तुम्ही आमच्या सारख्यांची फारच सोय केली आहे. दर अंकांत नाहीं कां ही एखादी बिंगमाला देतां येणार ? आपला

**दत्ता. बी. विचारे**

(दर अंकांत व्यंगचित्रें असतातच. आपण पहात नसल्यास यापुढें पहात चला. तुमच्या सारख्यांची सोय म्हणजे काय ?– **संपादक**) ☆☆☆

**तुमच्या (वि)श्वासावर देशाचा प्राण अवलंबून आहे. तेथें तन, मन, धन वहायचें आहे !**










यांच्यापेक्षा चार वर्षांनीं लहान असले तरी, त्यांना टेस्ट सामन्यांत प्रथम खेळण्याची संधी १९५१–५२ मध्यें, विशीच्या उंबरठ्यावर असतांना मिळाली. उम्रिगर यांचा टेस्ट प्रवेश वाविसाव्या वर्षी झाला. मांजरेकरांचें वैशिष्ट्य हें कीं ते सरळ शाळेंतूनच रणजी ट्रॉफी सामन्यांत खेळूं लागले व नंतर एक दोन वर्षांतच त्यांनी टेस्ट आखाड्यांत पाऊल टाकलें. कॉलेजमधली चार वर्षे पुरी होण्याच्या सुमारास स. १९४५ मध्यें पंचरंगी सामन्यांत खेळण्याची संधी उम्रिगरना लाभली, अन् नंतर १९४६ मध्यें ते रणजी करंडक सामन्यांत भाग घेऊं लागले. मांजरेकरांनीं क्रिकेटमध्यें पदार्पण केलें तें यष्टिरक्षक नि फलंदाज म्हणून तर उम्रिगरनी प्रवेश केला गोलंदाज म्हणून. आजमितीला मांजरेकर पट्टीचे फलंदाज असून प्रसंगीं यष्टिरक्षणाचा आपला लौकिक ते टेस्टमध्येंहि दाखवितात. उम्रिगरनी फलंदाज, गोलंदाज व क्षेत्ररक्षण या तिन्ही शाखांत उत्तम नांवलौकिक मिळवून टेस्टमधली आपली जागा बरेंच वर्षे कायम केली. शास्त्रसंपन्नता अन् तंत्रनिपुणतेचा विचार करतां, फलंदाजींत मांजरेकर उम्रिगरांपेक्षा उजवे, यावद्दल संशय नाहीं. पण अष्टपैलुत्व, प्रयत्नशीलता, फलंदाजीतलें सातत्य अन्-खेळावरील अढळ निष्ठा या चार गुणांमुळे उम्रिगरनी फलंदाजींत सिद्धहस्त असलेल्या व नैसर्गिक गुणसंपदा असलेल्या मांजरेकरांवर हां हां म्हणतां मात केली ! !

मांजरेकरांचा खेळ शास्त्रशुद्ध असल्यानें त्यांना लोकप्रियता फार लौकर मिळाली. आणि या अमाप लोकप्रियतेमुळेंच त्यांच्या क्रिकेटच्या कौशल्याचा ऱ्हास झाला. त्या मानानें उम्रिगरना लोकप्रियतेचें वरदान अंमळ उशीरानें लाभलें. स. १९४८ मध्यें वेस्ट इंडिज संघाविरुद्ध विद्यापीठ संघातर्फे खेळून त्यांनी शतक काढलें. (तें पाहूण्याची संधी प्रस्तुत लेखकाला लाभली होती) त्यांच्या पुढील नांवलौकिकाची ती नांदी होती. त्याच वर्षी विंडीज विरुद्ध एका टेस्ट सामन्यांत त्यांनी ३० धांवा केल्या. स. १९५१–५२ मध्यें इकडे आलेल्या एम्. सी. सी. संघाविरुद्ध पांच कसोटी सामने ते खेळले. त्या मालिकेंत मद्रासच्या अखेरच्या कसोटी सामन्यांत त्यांनी नाबाद १३० धांवा काढून टेस्टमधलें पहिलें शतक त्यांनी फडकविलें. त्यांच्या बॅटींगची सरासरी झाली ४०.५०. याच मालिकेंत मांजरेकरांचा उदय झाला. परन्तु त्यावेळीं त्यांचा फारसा प्रभाव दिसला नाहीं. २ कसोटी सामन्यांत ३ डावांत त्यांनी ७४ धांवा केल्या व त्यांची सरासरी झाली २४.६६. एवंच उम्रिगर-मांजरेकर यांची चुरस (दोघे निकटचे स्नेही आहेत) त्या वेळेपासून सुरू झाली. आणि पहिल्या झटापटींत उम्रिगरनीं विजय मांजरेकरांवर 'विजय' मिळविला.

या नंतर १९५२ सालीं भारतीय संघ इंग्लंडला गेला. तेथें झालेल्या कसोटी सामन्यांत उम्रिगरांच्या कौशल्याची अक्षरशः शोकान्तिका झाली. तेथील प्रथमश्रेणी सामन्यांत त्यांचा खेळ दमदार झाला पण टेस्टमध्यें त्यांचें कर्तृत्व साफ फिकें पडलें. ४ कसोटी सामन्यांत, ७ डावांत त्यांच्या फक्त ४३ धांवा झाल्या. सरासरी झाली ६.१४. इंग्लंडांत त्यांची एवढी दुर्दशा व्हावी हें त्यांचें दुर्दैव म्हटलें पाहिजे. तुलनेनें मांजरेकर इंग्लंडात बरेंच यशस्वी झाले. फक्त याच वेळीं आपण उम्रिगर यांच्यापेक्षां 'इस्सेभी जादा' आहोंत याची प्रचिती त्यांनी दाखविली. ४ टेस्ट सामन्यांत ७ डावांत त्यांनी १६२ धांवा काढल्या. त्यांची सरासरी झाली. २३.१४. पहिल्याच टेस्ट सामन्यांत लीड्स येथें आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांनी शतक (१३३) काढून चांगलें नांव मिळविलें. त्यांच्या संपूर्ण कारकीर्दीकडे नजर टाकल्यास त्यांचें तें उत्कृष्ट शतक म्हणून सांगता येईल. तशी उभारी यांनी पुन्हां कधी दाखविली नाहीं. पण इंग्लंडची ही टेस्ट मालिका विनू मनकडनी गाजविल्यामुळें मांजरेकर उम्रिगर जोडगोळीकडे कुणाचें विशेष लक्ष गेलें नाहीं. फलंदाजीतील तंत्रनिपुणता हा मांजरेकरांचा खास गुण. पण त्याचें वैशिष्ट्य अगर प्रभाव इंग्लंडांत फारसा पडला नाहीं. 'विस्डेन' वार्षिकाच्या 'पंचायतनांत' बसण्याचा बहुमान त्यांना लाभला (१९३२ त सी. के. नायडू, १९३६ त मर्चंट व १९४६ त विनू मनकड यांना हें मानाचें पान लाभलें होतें.) नाही हीं गोष्ट नजरेआड कशी करावी ? नायडू, मर्चंट व मनकड या त्रिवर्गांना हा मान पहिल्याच इंग्लंड सफरींत मिळाला. मांजरेकरांना तो मिळाला नाहीं व उम्रिगर यांचें इंग्लंडात अक्षरशः 'डंकर्क' झालें !

१९५२–५३ सालीं पाक संघ इकडे आला. त्यावेळीं उम्रिगरनी ५ टेस्ट सामन्यांत ६ डावांत २५८ धांवा केल्या. एक शतकहि काढलें. मांजरेकरांनी यावेळीं ३ कसोटी सामन्यांत ४ डावांत ५८ धांवा केल्या. उम्रिगर यांची बॅटींग सरासरी ४३.०० तर मांजरेकरांची भरली १४.५०. अर्थातच उम्रिगरांच्या कर्तृत्वाची कमान चढती ठरली. यानंतर भारतीय संघ, १९५३ सालीं वेस्ट इंडिजला गेला. ५ टेस्टमध्यें १० डावांत उम्रिगरनीं ५६० धांवा काढून ५ शतकें वेस्ट इंडिज संघाविरुद्ध केली. त्यांची सरासरी झाली ६२.२२ मांजरेकरांनी ४ कसोटी सामन्यांत ८ डावांत २५४ धांवा केल्या अन् एक शतक काढलें. त्यांची सरासरी भरली ३६.२८. त्यावेळीं वेस्ट इंडिज संघात वीक्स, वॉरेल, वॉलकॉट, स्टॉलमियर, ॲलन रे हे धुरंदर फलंदाज अन् व्हॅलेंटाईन, रामाधिन, गोमेज व किंग वगैरे प्रभावी गोलंदाज होते. तरीहि उम्रिगरनी आपल्या कर्तृत्वाचें नाणें खणखणींत असल्याचें पटवून दिले. त्यांचा त्यावेळचा पराक्रम अन् झेप सिंहासारखी भासली. मांजरेकरांचें 'शौर्य' सर्कशीतल्या सिंहासारखें थिटें ठरलें. या दौऱ्यांत उम्रिगर लोकप्रियतेच्या शिखरावर गेले, तर अल्पवयांतच भरमसाट लोकप्रियता लाभल्यामुळें मांजरेकरांचा पराक्रम या दौऱ्यांत मोहरमच्या वाघासारखा बेगडी वाटला.

स. ५४-५५ च्या पाक दौऱ्यांत उम्रिगरनी ५ कसोटी सामन्यांत ७ डावांत २७१ धांवा केल्या – एक शतक झळकविलें. त्यांची सरासरी झाली ४५.१६. मांजरेकरांनी ५ कसोटी सामन्यांत ८ डावांत २७० धांवा केल्या. त्यांची सरासरी भरली ४५. म्हणजे यावेळीं धांवसंख्येत दोघेहि समान तोलाचे ठरले. स. ५५–५६ मध्यें हे दोघेहि वीर न्यूझीलंड










संघाविरुद्धहि चांगलेच चमकले. पण त्यावेळीं विनू मनकडनी 'न भूतो न, भविष्यति' असा केल्यानें 'पॉली-विजय' या लोकप्रिय दुकलीकडे रसिकांचें दुर्लक्षच झालें. स. १९५६ मध्यें ऑस्ट्रेलियन संघ इकडे आला. तेव्हां कसोटी सामन्यांत आमचे हे पहिल्या प्रतीचे 'वीर' उम्रिगर-मांजरेकर कर्तृत्वानें फारच खुजे भासले. 'गलीव्हर्स' प्रमाणें सामर्थ्यवान असलेल्या ऑस्ट्रेलियन संघापुढें आमची पॉली-विजय जोडी 'लीलीपुट' सारखी लुकलुकली. अर्थातच त्यावेळची त्यांची आंकडेवारी सांगण्यांत स्वारस्य नाहीं.

१९५८-५९ सालीं वेस्ट इंडिज संघ इकडे आला तेव्हांहि उम्रिगरच विनीचे वीर ठरले. ५ टेस्ट सामन्यांत, ९ डावांत त्यांनी ३३७ धांव केल्या. त्यांची सरासरी ४२.१२ झाली. विजय मांजरेकरांना हॉलच्या 'हालाहल' फास्ट बोलिंगचें जहर पचवितां आलें नाही. आमच्या लोकप्रिय मांजरेकरनी त्यावेळीं ४ टेस्ट सामन्यांत ८ डावांत १४८ धांवा केल्या. त्यांची सरासरी झाली २४.६६. परन्तु त्यांच्या भाटांना त्याचें काय होय ! 'शास्त्रशुद्ध खेळणारा एकमेव भारतीय फलंदाज' अशा स्तुतीचे दिवे त्यांच्या भोवतीं सतत ओवाळले गेले. आणि या स्तुतीच्या पुटांमुळेंच त्यांच्या कौशल्याचा ऱ्हास होत गेला. शरीर स्थूल झालें–फुटवर्क सदोष भासूं लागलें. (५९ च्या इंग्लंडच्या दौऱ्यावेळीं त्यांच्या वेंगरूळ फूटवर्कबद्दल विजय मर्चंटनी 'टाइम्स' मध्यें टीका केली होती) १९५९ सालच्या इंग्लंड दौऱ्यांत उम्रिगरनी चांगली कामगिरी बजावली. टेस्टमध्यें त्यांनी शतकहि काढलें व ५२ सालच्या इंग्लंडमधल्या अपयशाचा डाग त्यांनी नाहीसा केला. मांजरेकरांच्या गुडघ्याला इजा झाल्यानें दोन स्टेस्ट सामन्यांनंतर दौऱ्याच्या भरल्या ताटावरून ते भारतात परत आले अन् नंतर निर्माण झालेल्या 'कवित्वांत' दिलगिरी व्यक्त करून त्यांनी कीर्ति मिळविली.

१९५९–६० मध्यें आलेल्या आस्ट्रेलियन संघाविरुद्ध पायाच्या दुखण्यामुळें मांजरेकर खेळले नाहींत. त्यावर्षी कानपूरला भारतीय संघाला जो दैदिप्यमान विजय मिळाला त्याचें श्रेय जसू पटेल ह्यांच्याप्रमाणें पॉली उम्रिगर यांनाहि दिलें पाहिजे. दुसऱ्या डावात ऑस्ट्रेलियन संघाची मोहरी त्यांनी उधळल्यामुळें पटेलना पुढचें कार्य सुलभ झालें. कांगारूला अजिंक्यपणाच्या सिंहासनावरून खालीं ओढण्यांत पटेलांबरोबर उम्रिगर यांचाहि वांटा आहे यांत शंका नाहीं. नंतर इकडे आलेल्या पाक संघाविरुद्ध उम्रिगरनी ३ शतकें काढली. मांजरेकरांची त्यावेळची सरासरी भरली ४९.४ तर उम्रिगरांची झाली ६३.६ म्हणजे यावेळींहि उम्रिगर, मांजरेकरांपेक्षां, कर्तबगारींत उजवे ठरले.

स. ६१–६२ मध्यें इकडे आलेल्या एम्. सी. सी. संघाविरुद्ध टेस्टमध्यें मांजरेकरनी मोठी मर्दमुकी गाजविली. ५ कसोटी सामन्यांत ७ डावांत त्यांनी ५८६ धांवा केल्या. त्यांची सरासरी झाली ८३.७१ उम्रिगरनी ४ टेस्टमध्यें ६ डावांत २५४ धांवा केल्या त्यांची सरासरी झाली ५०.८०. यावेळीं 'विजय' चे पारडे 'पॉली' पेक्षां बरेंच वर गेलें. लोकप्रियतेच्या अन् पराक्रमाच्या ऐन शिखरावर असतांना यावेळी मांजरेकरांनी निवृत्त होण्यांत खरी समयज्ञता अन् शहाणपण होतें. तसें झालें असतें तर वेस्ट इंडिजमधल्या आपल्या कर्तृत्वाचे दुर्दैवाचे दशावतार पाहण्याचे दुर्भाग्य जें त्यांच्या वांट्याला आलें तें टळलें असतें. पण भवितव्यता कोण टाळणार ? स. ६२ च्या वेस्ट इंडिज दौऱ्यांत विजय मांजरेकरांच्या तंत्रनिपुण खेळाचें थडगें बांधलें गेलें तर उम्रिगर यांच्या तालेवार खेळाचा ताजमहाल दिमाखदारपणें उभा राहिला.

वेस्ट इंडीजमध्यें (स. १९६२) टेस्ट सामन्यांत उम्रिगरनी ५ टेस्टमध्यें १० डावांत ४४५ धांवा केल्या. त्यांची सरासरी भरली ५४.७१. मांजरेकरांनी ५ टेस्टमध्यें १० डावांत १६७ धांवा केल्या. त्यांची सरासरी झाली १६.७०. चौथ्या टेस्टमध्यें १ ल्या डावांत उम्रिगरनी वेस्ट इंडिजच्या ५ विकेटस् घेतल्या. आपल्या पहिल्या डावांत त्यांनी ५६ धांवा केल्या तर दुसऱ्या डावांत नाबाद १७२ धांवा केल्या. बस्स. या सामन्यानें उम्रिगर अमर झाले. हा सामना क्रिकेटच्या इतिहासांत उम्रिगर सामना म्हणून सुवर्णाक्षरांत लिहिला जाईल. असें भाग्य असा 'विजय' मांजरेकरांच्या क्रिकेट जीवनांत कधीहि दिसला नाही. आणि म्हणून कर्तृत्वाच्या तुलनेंत विजयनी हार खाल्ली अन् उम्रिगरांची जित झाली !

मांजरेकरांचे बॅटींग टेक्निक अत्यंत निर्दोष आहे. विजय मर्चंटसारखे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे खेळाडू नभोवाणींवर अजुनहि त्यांच्या तंत्रनिपुणतेचे कौतुक करीत असतात, त्यावरून त्यांच्या प्रगतीची कल्पना येते. ऐन उमेदींत त्यांचें फुटवर्क उत्तम असे. आतां तें तितकें राहिलेलें नाहीं. कशाहि प्रकारच्या बोलींगवर खेळण्यांत त्यांचा हातखंडा. पुढें जाऊन टोलविण्यास ते कधीं डरत नसत. लेगब्रेक बोलिंगहि पुढें जाऊन झोडपण्यास स्वारी तयार. कव्हर ड्राईव्ह, पूल व स्क्वेअर कट्सचें फटके मारण्यां ते तरबेज. हुक्ची मिरासदारी त्यांचीच. मनगटें मजबूत अन् आत्मविश्वास दांडगा. 'टेंपरमेंट' शंभर नंबरी. नजर घारीसारखी स्वच्छ अन् तीक्ष्ण. ही झाली त्यांच्या गुणांची बाजू. परंतु खेळाला लागणारी शिस्त व इतर आवश्यक असलेलें 'पथ्यपाणी' त्यांनी न पाळल्यानें त्यांचे गुण वांया गेले. खेळावरील निष्ठा अन् शिस्तपालन हे गुण त्यांचे अंगी असते तर विजय मर्चंटसारखी त्रिखंड कीर्ति त्यांना लाभली असती. खेळाडूनें कसल्याहि प्रलोभनाला बळी पडूं नये असा आहे क्रिकेटचा दंडक. मांजरेकरांनी तो चोख पाळला असें कसें म्हणावें ?



बहुतेक तें बॅट्समनचें दिसतें .....

ते ४७ टेस्ट सामने (स. १९६२ चा वेस्ट इंडिज दौरा धरून खेळले. ७७ डावांत त्यांनी २६८३ धांवा केल्या. ८ वेळां ते नाबाद राहिले. त्यांनी शतकें काढली ५, २ इंग्लंडविरुद्ध, २ न्यूझीलंड विरुद्ध, अन एक वेस्ट इंडिज विरुद्ध. त्यांची सरासरी भरते ३८.८८. त्यांच्या कितीतरी मागून आलेल्या वेस्ट इंडिजच्या सोबर्सने ४७ टेस्टमध्यें ४००० च्या वर धांवा केल्या ही गोष्ट त्यांच्या तंत्रनिपुणतेचे ढोल वाजविणाऱ्यांनी लक्षांत ठेवावी. आपल्या देशांत ते पहिल्या प्रतीचे फलंदाज आहेत याबद्दल दुमत होऊं नये, पण जगांतील फलंदाजांच्या तुलनेंत त्यांचें कर्तृत्व फारच कमी दिसतें.

क्रिकेटच्या शास्त्रसंपन्नतेंत उम्रिगर मांजरेकरांहून कमी ठरतील. परंतु धांवा काढण्याच्या सातत्यात ते सरस अन् श्रेष्ठ ठरतात. आणीबाणीच्या प्रसंगीं त्यांच्या खेळ धिमा. त्यांच्या झंझावाती खेळाचें दर्शन त्यांनी ४ थ्या टेस्ट सामन्यांत (१९६२) विंडीज विरूद्ध १७२ धांवा ज्या वेगानें केल्या त्यावेळीं रसिकांना पुरेपूर घडलें. त्यांचे क्षेत्ररक्षण अव्वल दर्जाचें, बोलिंगची शाखाहि ते यशस्वीपणें सांभाळतात. नेतृत्वाचे गुणहि त्यांच्या ठायीं होते. हजारे यांच्या नंतर त्यांना जर सतत कांहीं वर्षे संघ नायकत्व मिळालें असतें तर भारतीय क्रिकेटचा इतिहास वेगळा झाला असता. ५९ टेस्ट सामने ते सातत्यानें खेळलें व तेंहि बऱ्यापैकीं फॉर्म ठेवून हीं एकच बाब त्यांचें कर्तृत्व सिद्ध करण्यास पुरी आहे. ५९ टेस्ट सामन्यांत, ९४ डावांत त्यांनी ३६३१ धांवा केल्या. ८ वेळां ते नाबाद राहिले. त्यांनी एकंदर १२ शतकें काढली. ३ इंग्लंड विरुद्ध, ३ वेस्ट इंडिजविरुद्ध, ५ पाकिस्तानविरुद्ध व १ न्यूझीलंड विरुद्ध. त्यांची सरासरी आहे ४२.२ टेस्ट सामन्यांत ३५ विकेटस्हि त्यांच्या नांवे आहेत.

उम्रिगर यांचे व्यक्तिमत्व डोळ्यांत चटकन् भरतें. गव्हाणी वर्ण, भरपूर उंची, रुंद खांदे, प्रमाणबद्ध शरीरसंपदा अन् गरुडा-सारखी लांब नासिका असलेल्या त्यांच्याकडे पाहिलें कीं एखाद्या रोमन योद्ध्याचें चित्र मनांत उभें रहातें. मांजरेकरांना असें आकर्षक व्यक्तिमत्व नाहीं. शिस्तपालनांतहि उम्रिगर उजवे ठरतील. स. १९५९ मध्यें इंग्लंडच्या दौऱ्याहून आल्यावर या दोघां-वर शिस्तभंगाच्या 'नोटीसा' लागल्या, मांजरेकरांनी सरळ माफी मागून आपली सुटका कशीबशी करून घेतली, तर उम्रिगर यांनी आपली बाजू खणखणीतपणें पुढें मांडून बोर्डास आपल्यावरील आरोप मागें घेण्यास भाग पाडलें, या घटनेवरून उभयतांच्या चरित्र्यावर चांगलाच प्रकाश पडतो.

खेळाच्यादृष्टीनें १९६२ च्या विंडीज दौऱ्यांत पॉली उम्रिगर 'वीर' ठरले तर विजय मांजरेकर 'विदूषक' ठरले. हा दौरा उम्रिगरांचा परमोत्कर्षाचा ठरला तर मांजरेकरांचा तेव्हां पुरा अपकर्ष झाला. 'आपुलें मरण पाहिलें म्या डोळां' अशी त्यांची स्थिती झाली. उम्रिगरनीं १९५३ व १९६२ चा विंडीजचा दौरा गाजविला. मांजरेकरांचा १९५३ चा तो दौरा यथातथाच ठरला तर १९६२ च्या विंडीज दौऱ्यांत त्यांचे 'वाटर्लू' झालें. पराक्रमाच्या शिखरावर असतांना निवृत्त होण्याचें तारतम्य क्रीडाक्षेत्रांत खेळाडूनें दाखविलेंच नाहिंजे, नाहींतर संघ निवडीच्या वेळीं कधींतरी गचांडी मिळून त्याला मानहानी पत्करावी लागते. हजारे–मनकडना अशीच मानहानी पत्करावी लागली. मर्चंटनी मात्र स्वखुशीनें योग्यवेळीं क्रिकेटच्या निरोप घेतला. उम्रिगरनी त्यांचे अनुकरण करून औचित्य दाखविलें, अन् मांजरेकर अजून खेळतातच आहेत. 'मांजरेकर हाज् मिस्ड् दि बस' एवढेंच त्यांच्यासंबंधीं म्हणावयाचें नि काय !

आतां दोघांत श्रेष्ठ कोण एवढाच प्रश्न उरला. दोघेहि भारतीय क्रिकेटचे शिल्पकार. दोघांनी भारतीय क्रिकेटच्या अभिवृद्धिसाठीं यथाशक्ति प्रयत्न केले. फलंदाजीतील तांत्रिक बाजूचा विचार करतां मांजरेकरांना भारतात तोड नाहीं हें खरें, पण या नैसर्गिक गुणाचा फायदा उठविण्यांत ते फारसे यशस्वी झाले नाहींत. त्यांच्या क्षेत्ररक्षणासंबंधीं तर बोलावयासच नको. कित्येक वेळां जागचे हालतील तर शपथ. त्यादृष्टीनें उम्रिगर हे अष्टपैलु क्रिकेटपटु. इतर शाखा सांभाळत असतांना फलंदाजीतहि त्यांनी मांजरेकरांच्याहून जास्त नेत्रदिपक पराक्रम केला याची साक्ष त्यांच्या आंकडेवारीत दिसेल. आदर्श खेळाडू या दृष्टीनें ते मांजरे-करांहून कितीतरी पटीने सरस अन् श्रेष्ठ आहेत असाच रसिकांचा अभिप्राय आहे. शिवाय पराक्रमाच्या परमोत्कर्षावर असतांना टेस्ट क्रिकेटला रामराम ठोकण्यांत त्यांनी जो संयम अन् शहाणपणा दाखविला त्यावरूनहि त्यांची योग्यता ध्यानीं येते. टेस्ट संघांत निवड समितीकडून अर्धचंद्र मिळविण्यापूर्वी, यापुढें मांजरेकर बॅट कधीं म्यान करतात याकडे क्रिकेट प्रेमिकांच्या नजरा लागतील पॅटसी हेंड्रेनच्या उत्तराचे स्मरण ठेवून योग्य वेळींच ते निवृत्त होतील तर त्यांत खरी मौज आहे–खरे 'क्रिकेट' आहे. सध्या 'हॅट्स् ऑफ टू पद्मश्री, पॉली उम्रिगर' अन् 'रिटायर ऑनरेबली' अशीच घोषणा उम्रिगर–मांजरेकरांबद्दल करूंया ! ! !

●●●




महाराष्ट्राचे लाडके विनोदी लेखक व "बहुरुपी"

**– पु. ल. देशपांडे**

यांची "दीपावली" साठीं खास मुलाखत.
(थांबा) 'जानेवारी' अंकांत ती प्रसिद्ध होईल.




अनुः श्रीकृष्ण ठाकूर

: १ :

**देह आणि मन बिलकूल न थकतां जर का मानवाला ९० अंश उत्तर रेखांशावर जाणं शक्य झालं तर अनुपम असा, पूर्वीं कधींहि न अनुभवलेला असा आनंद त्याला उपभोगावयास मिळेल....पण हा उत्तर ध्रुव मानवाला सहजासहजीं तिथं जाऊं देणार नाहीं. तो त्याची कठोर कठोर परीक्षा घेईल....**

**उत्तरेकडील** प्रिन्स कार्लस् फोरलंडच्या दिशेनं स्केटनं पाणी कापावयास सुरुवात केली तेव्हां तिच्यावरील सर्व खलाशांनीं कौशल्यानें व आत्मविश्वासानें आपापलीं कामें केलीं. पण जेव्हां आम्ही हिवाळी उत्तर अटलांटिक-मध्यें प्रवेश केला तेव्हां शांत समुद्रानें आपलं नेहमींचं रूप टाकून जहाजाला हेलकावे देण्यास सुरुवात केली. लेमन यानें पेरिस्कोपच्या खोलीइतक्या पाण्यांत जहाज आणलं. तिथून त्याला सूर्याचे कांहीं फोटो घ्यायचे होते. पण एक मिनीट पेरिस्कोपमधून स्वच्छ दिसायचं तर दुसऱ्या मिनिटाला हिरव्यागार पाण्याचे लोटच्या लोट त्यावरून कोसळायचे. जेव्हां आम्ही भरपूर खोल पाण्यांत गेलों तेव्हांच आम्हांला खरं हायसं वाटलं.

जहाजाच्या आंत नेहमीची खेळाडू वृत्तीची थट्टामस्करी चालूं होती. आर्क्टिक्ट सर्कल ओलांडण्याची वेळ आली त्यापूर्वींच खलाशांच्या भोजनगृहांत नवशिक्यांना डोक्यावर रुमाल बांधून न्यायाधिशापुढें आणण्यांत आलं. न्याया-धिशानें झगझगणारं तांबडं लांबलचक अंतर्वस्त्र परिधान केलं होतं. प्रत्येक गुन्हेगाराला बर्फगार थंड पाण्यांत बसण्याची शिक्षा सांगण्यांत येई. त्या पाण्यांतून विजेचा सौम्यसा प्रवाह सोड-ण्यांत आला होता. त्या प्रवाहानं त्याला छोटासा धक्का बसायचा. तें पाहून प्रेक्षकांतून हास्याचा कल्लोळ उठायचा.

चौदा मार्च शनिवारीं दुपारीं समुद्राचं पाणी कापून पेरिस्कोप वरती आला व मला घुरकटलेल्या वातावरणाचं – हवेचं दर्शन झालं. त्यावेळीं दुपारचे दोन वाजले होते तरी जवळ जवळ काळोख पसरला होता. आमच्या-कडील तक्त्यावरील नोंदीवरून आम्ही प्रिन्स कार्लस् फोरलंडजवळून जात आहोंत असें दिसलें. मला काहीं कुठें जमीन दिसेना पण रडारच्या योगें आम्ही कुठें आलों तें कळलं.

सात महिन्यांपूर्वींच्या एका शनिवार-सायं-काळची मला आठवण झाली. तेव्हां आम्ही याच ठिकाणीं होतों व आतां करीत आहोंत तीच गोष्ट करीत होतों. तसेंच सत्तावीस वर्षांपूर्वींची ऑगस्टची एक सायंकाळ आठवली. तेव्हां दुसरी एक पाणबुडी प्रिन्स कार्लस् मार्गें बर्फाळ प्रदेशांत शिरली होती. ती पाण्याच्या पृष्ठभागावर मोठ्या कष्टानें उभी होती. तिचं एक डिझेल इंजीन चालूं होतं. दुसरं डिझेल इंजीन नादुरुस्त झालं होतं व तिच्य[illegible] वरील खलाशी परतण्यासाठीं गोंगाट कर[illegible] होते. पण त्यांच्यांत एक बळकट इच्छाशक्ती[illegible] मनुष्य होता त्यानं त्या सर्वांना आपल[illegible] म्हणण्याप्रमाणें वागावयास लावलं. ते [illegible] पुढें उत्तरेच्या दिशेनं जाऊं लागले.

तो पोलादी इच्छाशक्तीचा पुरुष–त्याच[illegible] दुर्दम्य आशा-आकांक्षा याची आतां चिमुट[illegible] राख उरली होती व ती माझ्या केबीनम[illegible] छोट्या ब्रॉंझच्या पेटींत होती. सर हर्बर्ट प[illegible] एक वेळ प्रिन्स कार्लसच्या मार्गें प्रवास कर[illegible] होते.

आम्ही कुठें आहोंत याविषयींची एकदा निश्चिती केली व मग चारशें फूट खोल ग[illegible] आणि नंतर उत्तरेच्या दिशेनें प्रवासास सुरुव[illegible] केली. थोड्याच तासांत, डॉ. लायन यां[illegible] शोधून काढलेल्या आमच्या नव्या बर्फशोध[illegible] वर (Ice-detector) एकाएकीं चढउत[illegible] दिसूं लागला. बर्फ-शीला, त्यांच्या मर्याद[illegible] गेल्या उन्हाळ्यापेक्षां हें सारं पुष्कळसं दक्षि[illegible] कडे होतं–आणि या क्षणीं तें आमच्या माथ्[illegible] वर होतं.

आइस-मशीन ही चौकस खलाशांच्या दृष्टीनं कांहीं जास्त कुतुहलाची बाब राहिली नव्हती. त्याऐवजीं उत्साही खलाशांचा तांडा आतां टेलव्हीजनच्या पडद्यासमोर गोळा झाला होता. आर्क्टिकमधल्या अपुऱ्या संधिप्रकाशाच्या उजेडांत आमच्या डोक्यावरून जाणाऱ्या प्रचंड बर्फाच्या डोंगरांचें प्रतिबिंब त्या पडद्यावर दिसत होतें. आवश्यक उपकरणं उपलब्ध न होण्यांतला अडथळा संपला होता आणि एकदाचं आम्हांला हें सारं पहातां येत होतं.

रात्री नऊच्या सुमारास मात्र आमच्या माथ्यावरील बर्फ अतिशय दाट झालं. टेलव्हिजनच्या पडद्यावर संपूर्ण काळेपणाशिवाय कांहीं दिसत नव्हतं. आमचा प्रवास सुरळीत चालला असतां मध्यरात्रींच्या सुमारास पंखा जोडलेल्या फिरत्या दांड्याशेजारी असलेल्या घट्टपणें बंद केलेल्या छिद्रांतून पाणी आंत येत आहे, हें सांगण्यासाठीं डेव्ह् बॉइड्नें मला बोलावलं. घाईघाईनें मी एंजिन रूममध्यें गेलों. पुष्कळ लोकांच्या समवेत तिथल्या एका कोपऱ्यांत डेव्ह् चिंतातुरपणें वाकलेला मी पाहिला. काळोख्या कोपऱ्यामध्यें त्यानें आपल्या विजेरीचा उजेड पाडला, तेव्हां फिरता लोखंडी दांडा (shaft) ज्या ठिकाणीं जहाजाच्या बाहेरच्या भागापर्यंत घुसला होता त्या ठिकाणाहून पाण्याचा बारीकसा फवारा उडतांना दिसला. पाणी इंजिन रूममध्यें तळाला सांचत होतं. अद्यापपर्यंत तरी पाण्याचा जोरदार फवारा येत नव्हता. आम्ही आमच्या पंपानें तें पाणी सहज काढून टाकूं शकत होतों. पण तें पाणी अधिक येऊं लागलं तर घोटाळा होईल. क्षणभर माझ्या मनांत विचार आला कीं पुढें बर्फ-शीलांच्या आंत जाण्याऐवजीं मागें परतावं. 'तुला काय वाटतं ?' मी डेव्हला विचारलं.

'आपण शॅफ्ट मागें घ्यावी. तसं केल्यानें केव्हां केव्हां काम भागतं.' तो म्हणाला.

मी होकारार्थी मान डोलविली; व मशीनच्या आवाजापेक्षां मोठ्यानें ओरडून तशी सूचना केली. तेव्हां ती शॅफ्ट हिस्स् आवाज करून थांबली; व नंतर विरुद्ध दिशेनं सावकाश फिरूं लागली. तेव्हां तो प्रचंड पंखा पाण्यामध्यें घुसला गेला तेव्हां आमची पाणबुडी थरारली व एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत हालली.

आणि लगेच आमच्या अंगावर बर्फमय थंडगार-खारट पाण्याचे फवारे उडाले. तें पाणी त्या छिद्रांतून जोरदारपणें येत होतं व सर्व दिशांनीं उडत होतं. काय बरं चुकलं ? तो प्रचंड पंखा जहाजाबाहेर येऊन पाण्याला जसजसा चिवडीत होता तसतसं आमचं जहाज थरथरत होतं; आणि होणारा प्रचंड आवाज कानठळ्या बसविणारा होता.

आणि मग – आपण तोटी बंद केल्यावर होतं तसं – एकाएकी पाणी यायचं थांबलं. 'शॅफ्ट फिरवायची थांबवा.' मी ओरडलों. जहाजाचं थरथरणं थांबलं. आतां सारं व्यवस्थित होतं. फक्त किंचितसं पाणी तेथून येत होतं.

मला अगदीं हायसं वाटलं. 'बॉऽ !' मी अगदीं थकल्या आवाजांत उद्गारलों.

'अजूनहि आपणाला काळजी घेतली पाहिजे.' डेव्ह् म्हणाला. 'तें सील सरकलं कीं केव्हां केव्हां अगदीं घट्ट बसतं; आणि मग आपली खरी पंचाईत सुरू होईल. जहाज पुढें न्यायचं ना ?'

मॅनेव्हॅरिंग रूममध्यें मी हुकूम सोडले. शॅफ्ट सावकाशीनं फिरावयास लागली, आणि जसजशी स्केटनें गति घ्यावयास सुरुवात केली तसतशी ती शॅफ्ट जोरजोरानें फिरावयास लागली. शेवटीं आम्ही ताशीं सोळा नॉटच्या गतीपर्यंत आलों. सील व्यवस्थित होतं.

रिॲक्टरमधून मी माझ्या खोलीकडे सावकाशपणें चालू लागलों. पण माझं मन अस्वस्थ झालं होतं. आमच्या बर्फाखालील पहिल्या समुद्रपर्यटनाच्या वेळीं कसं सारं सुरळीत चाललं होतं. आणि आतां ज्या सफरींत सारं कांहीं कमालीचं व्यवस्थित व्हायलाच पाहिजे होतं, तींतच आमचं दुर्दैव आमच्या विरुद्ध जाणार आहे का ?

त्या रात्रीं मात्र मला झोंप लागली नाहीं.

सकाळच्या चहापानापूर्वी मी कंट्रोलसेंटरमध्यें गेलो. बर्फ शोधणाऱ्या यंत्रापाशीं वॉल्ट विटमन् उभा होता.

'वॉल्ट कसं काय दिसतंय् ?' मी विचारलं.

वॉल्टनें आपलं डोकं हालवलं. 'अख्ख्या रात्रींत एकहि तळं दिसलं नाहीं. एकशें नव्वद मैलांपेक्षां जास्त प्रवास झाला. पण डोक्यावर बर्फ-बर्फ आणि बर्फ.'

आश्चर्यानें शीळ घालीत मी टेलव्हिजन पडद्याकडे गेलो. सरकत्या बर्फाचे भलेमोठे काळे पट्टे दिसत होते. त्यांतून धूसर उजेड झिरपत होता. बर्फखंडाच्या बाह्यरेषेभोवतीं

## फक्त एक गडी बाद नि खेळ खतम्



क्रिकेट शौकिनांना क्रिकेटच्या खेळांतील अनेक उच्चांक ठाऊक असतील परंतु प्रत्यक्ष खेळावयास उतरलेल्या सबंध संघापैकीं फक्त एकच एक गडी बाद झाल्यानंतर संघाच्या कप्तानानें-संघनायकानें-आपला खेळ संपल्याचें घोषित केल्याचें तुमच्यापैकीं किती क्रिकेट रसिकांना ठाऊक आहे ?

१९३२ सालीं यॉर्कशायर व इलेक्स् यांचेमध्यें तीन दिवसांचा क्रिकेटचा सामना चालूं होता. यॉर्कशायर संघानें ओलीसुकी जिंकून फलंदाजी पत्करली. विलकर व होम्ज या आघाडीच्या जोडीनें यॉर्कशायर संघाच्या वतीनें खेळण्यास सुरुवात केली आणि सांगावयाची मौज म्हणजे विलकर व होम्ज या जोडीनें नाबाद ५५५ धांवा केल्या. सुरुवातीचा फक्त एकच खेळाडू बाद झाला होता आणि इलेक्स संघ यॉर्कशायर संघाच्या या बहादूर जोडीस बाद करण्यास अगदींच असमर्थ ठरला. आणि शेवटीं व्हावयाचें तेंच झालें. इलेक्स संघानें १ डाव व २१३ धांवांनीं सडकून मार खाल्ला.

–सदानंद चेंदवणकर










पातळ बर्फ चिकटलेलं होतं. जणूं काय प्रचंड अशा फ्रूट जेलो सलाडमधून आपण पहात आहोंत असं वाटे.

उत्तरेच्या दिशेनं जास्त पुढें जाण्यापूर्वी समुद्रपृष्ठभागावर येण्याचा सराव करण्यासाठीं आम्ही आतां फार उत्सुक झालों होतों. माझ्या मनांतील विचारांचं प्रतिबिंबच डेक ऑफिसरच्या विचारांत पडलं असावं. कारण त्यानें मला रिपोर्ट पाठविला कीं आजुबाजूला कुठें उघडी जागा दिसण्याची शक्यता आहे कीं काय हें पहाण्यासाठीं आपण जहाज आजुबाजूला फिरवतों. उघडी जागा दिसण्याची 'शक्यता' – शब्द कानाला चमत्कारिक लागला. गेल्या उन्हाळ्यांत उघडी जागा नक्की आहे किंवा उघडी जागा नक्की नाहीं हेच शब्द ऐकूं येत होते.

जेव्हां मी आइस-मशीनचा तक्ता पहावयास गेलों तेव्हां सर्वांना कसलं कोडं पडलं याची मला कल्पना आली. तासचेतास गेले तरी बर्फयंत्राचा काटा एकच गोष्ट दर्शवित होता. भरगच्च बर्फाचा अखंड थर, मैलच्या मैल जाड सरकतं बर्फ. क्वचित् कुठें दोन बर्फशीलांमधून लोंबकळणारं बर्फ. आतां तो बर्फदर्शक लंबक वर उडाला व लांब-रुंद रेषा दर्शवूं लागला. पण त्यांतहि धोक्याची छोटीशी सूचना होतीच – ती रेषा सुस्पष्ट आणि तीक्ष्ण नव्हती. गेल्या उन्हाळ्यांत उघडीक आली कीं स्पष्ट आणि तीक्ष्ण रेषा दिसे. म्हणजे आमचं हें नवं आइस-मशीन सदोष आहे कीं वरती पातळ बर्फ असल्याची ही निशाणी आहे ?

एका संभवनीय उघडकीखालीं आम्ही थांबलों. टेलव्हीजनवर घुरकट करड्या रंगाशिवाय कांहीं दिसत नव्हतं. पेरिस्कोपमधून मी पाहिलं तर वरून फक्त फिक्कट उजेड येत होता. मी गाय शफरला जहाज शंभर फूट वर घेण्यास सांगितलं. पण जसजसे आम्ही वर जाऊं लागलों तसतसा मी बर्फाच्या प्रचंड शीला व त्यांच्या कडा अणुकुचीदार कुठें दिसतात कां तें पाहूं लागलों. पण व्यर्थ. आधीच्या सफरींत पुलीन्यच्या बाजूला नेहमीं असं दृश्य दिसायचं. आतां फक्त धूसर हिरवट निळसर उजेड वरून येत असल्याचं मला दिसत होतं.

'मला वाटतं आपण गोठून गेलेल्या एका मोठ्या तळ्याखालीं आहोंत.' मी जाहीर केलं. 'पण बर्फाचा पापुद्रा फार जाड असेल असं समजूं नका – कारण मला मधून मधून वरून येणारा उजेड दिसत आहे.' मी अल् केहनकडे वळून त्याला विचारलं 'बर्फ किती जाडीचं असेल ?'

'नक्की सांगतां येत नाहीं.' तो म्हणाला. 'आपल्या यंत्रांत इतकी सूक्ष्मता ठेवलेली नाहीं.'

'पण तूं अंदाज करूं शकत नाहींस का ?' मी विचारलं.

'हो - तें तीन फुटांपेक्षां जास्त जाड नसावं– आणि कदाचित् चार पांच इंच इतकं पातळहि असूं शकेल.' तो म्हणाला.

ती रविवारची सकाळ होती. आणि गेल्या ऑगस्टमध्यें आमच्या सफरीवर आम्ही पहिली महत्वाची आणि फार यशस्वी गोष्ट केली तीहि रविवारीं सकाळींच. मला वाटतं जेव्हां जेव्हां माणसं समुद्रावर जातात तेव्हां तेव्हां धर्मभोळेपणाचा एखादा तंतू ते बरोबर नेतातच. मी माझ्या मनाची तयारी केली.

'बर्फ फोडण्याची तयारी करूं या' मी म्हणालों. 'स्केट वर घ्या.' मी गायला म्हणालों. काळ्या खोलींतून आमचं जहाज हळुहळु वर येत होतं, तेव्हां पाणी सोडणाऱ्या पंपाचा 'भुईऽऽ' असा होणारा आवाज खोलीभर भरून राहिला होता. 'फ्लड लाइटस् वर करा' मी हुकूम केला. पण त्या दिव्यांचा फारसा उपयोग होत नाहीं असं जेव्हां मला आढळलं तेव्हां मी निराश झालों. धुक्यामध्यें मोटारचे हेडलाइटस् लावल्यासारखं होतं तें. तें कसंहि असलं तरी त्या घुरकट पिवळ्या उजेडांत मला आमचे जुने मित्र – जेलीफीश दिसले.

आम्ही आतां बर्फथराच्या इतके जवळ होतों कीं सुरक्षिततेसाठीं पेरिस्कोप खालीं करायला हवा. आतां मला कांहींच दिसेना. ज्या ठिकाणीं धडक मारायची त्याठिकाणीं टेलव्हिजन कॅमेरा रोखण्याचं आम्ही ठरविलं.

'जहाजाच्या वरच्या भागावर फ्लडलाइटस् सोडला' मी हुकूम दिला. टेलव्हिजन पडद्याच्या वरच्या भागांत उजेडाचा प्रचंड झोत दिसला. आणि फारफार वर जिथें फ्लडलाइटस्नीं वर्फ चकाकत होतं त्याचं पुसट चित्र दिसत होतं. आम्ही जसजसे वर जात होतों तसतसा तो उजेडाचा झोत बारीक बारीक आणि जास्त जास्त सुस्पष्ट होत होता. धडक बसल्यावर आपण पडूं नये म्हणून प्रत्येकजण आपापल्या जागीं घट्ट रोवून उभा होता.

आपण लिफ्टमध्यें बसून वर जात आहोंत व ती अपेक्षेपेक्षां अधिक झटक्यानें थांबली तर जसं वाटेल तसं झालं. माझ्या पोटांत ढवळल्यासारखं झालं. पाणबुडी बर्फावर आपटल्याचा आवाज झाला नाहीं. पण टेलव्हिजन पडद्यावरती उजेडाचा झोत लांबट होत होता. आम्ही खालीं जात होतों.

मी खोली-मापक यंत्राकडे पाहिलें. आम्ही शंभर फूट खालीं आलों होतों व आणखीहि खालीं जात होतों. जीवावर उदार होऊन गायनें आंतील पाणी पंपानें बाहेर काढून फेकलं. त्यामुळें जहाज खालीं जायचं थांबून आहे तेथेंच राहील ही अपेक्षा. टाक्यांतील पाणी झटकन फेकून

## महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं : बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें ताबडतोब निकालांत काढलें जाईल. त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्र-व्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याचीहि कृपया नोंद घ्यावी.**

**—संपादक**

ेतां आलं असतं पण माथ्यावरील वर्फाचा वचीर करतां तसं करणं अविचाराचं ठरलं असतं.

दीडशें फुटावर गाय स्केट थांबवूं शकला. टेलव्हीजनमधून मी जहाजाचा वरचा भाग पाहिला. तो नादुरुस्त दिसत नव्हता.

'आपण परत धडक देऊंया.' मी निश्चयपूर्वक म्हणालों. 'यावेळीं मघांपेक्षां जोरानें' आणि आम्ही परत वर जावयास सुरुवात केली. आम्ही जसजसे वर्फाच्या जवळ जात होतों तसतसा उजेडाचा झोत परत बारीक होत गेला. मी माझा श्वास रोखला. पेरिस्कोप स्टँडला माझी पाठ टेकली व टेलव्हिजन पडद्याकडे झपाटल्या-सारखा पाहूं लागलों.

आम्ही धडक दिली तेव्हां परत एकवेळ झोकांडी गेली. पण आतां पडद्यावर खळ-वळत्या पाण्याचं प्रतिबिंब दिसलं तसंच फुटलेल्या बर्फाचे इतस्ततः उडलेले तुकडे दिसले. बर्फाच्या त्या प्रचंड चुरडण्यानें कंट्रोलसेंटर हादरला. टेलव्हिजन पडद्यावर जहाजाचा वरचा भाग कांहीं दिसेना. म्हणजे आम्ही बर्फाचा थर फोडून वर गेलों होतों तर!

'पेरिस्कोप वर करा.' असं म्हणून मी त्याची मूठ घट्ट पकडली व आयपीसला डोळा लावला. आणि पाहिलं तों काय! लाँड्रीमधून आलेला पांढरा शुभ्र उशीचा अभ्राच मला दिसत होता. जास्त स्वच्छ व स्पष्ट दिसेल म्हणून मी भिंग वर केलं. पण छे!

काय झालं तें नंतर माझ्या लक्षांत आलं. ओलाचिंब पेरिस्कोप जेव्हां आर्क्टिक्टच्या कडाक्याच्या थंड हवेंत वर आला तेव्हां तिथल्या थंडीनें त्या पाण्याचा पातळ बर्फ झाला व त्याचा थर पेरिस्कोपवर जमला. त्यामुळें निरुपयोगी झालेल्या पेरिस्कोपचा दांडा मी बाजूला केला. आतां आमच्या पाणबुडीचं शीड वर्फाबाहेर पृष्ठभागावर असून पाणबुडी मात्र पृष्टभागाखालीं आहे. टेलव्हिजन कॅमेरा हा जहाजाच्या डेकवर होता आणि डेक अद्याप पाण्याखालीं असल्या कारणानें आम्हांला त्याचाहि काहीं उपयोग होत नव्हता.

मी क्षणभर थांबलों. आतां काय करावं? टाकींतील सर्व पाणी काढून टाकून जहाज पृष्ठभागावर आणणं कदाचित् धोक्याचं होतं. विशेषतः नाजूक असा सुकाणूंचा भाग अद्याप बर्फाखालीं होता. पण थोडासा धोका हा पत्करायला हवाच होता. मी ब्रीजवर जाऊन प्रत्यक्ष पाही-पर्यंत आजुबाजूच्या वातावरणाची आम्हांला कांहींच कल्पना येणार नाहीं.

'गाय, टाकींतील पाणी काढून टाक, पण सावकाशीनं.' मी म्हणालों.

'हिस्स' असा आवाज झाला, व जास्त दाबाची हवा खोलींत भरूं लागली. कांहीं क्षण काहींच झालं नाहीं. मग स्केट सावकाशीनं वर जाऊं लागली. फुटण्याच्या बर्फाचा किंवा चुरडण्याच्या धातूच्या पत्र्यांचा आवाज आम्ही साव-काशीनं ऐकण्याचा प्रयत्न करूं लागलों पण हवेच्या प्रचंड गोंगाटापुढें कांहींच ऐकूं येईना.

शेवटीं स्केट भरपूर वर आली तेव्हां मला कळलं कीं स्केटचें झडप पाण्याच्या पृष्ठभागावर आहे. टाक्यांत हवा भरणं बंद कर असं मी शॉफरला सांगितलं.











क्वार्टरमास्टर जॉन मेडाग्लीया शिडीवरून ट्यूबमार्गे झडपाकडे जात होता. 'डेकचं झडप उघडं' मी त्याला ओरडून सांगितलं. तें जड धातूचं झडप उघडलं जातांच हवेच्या दाबांत फरक पडला व तो माझ्या कानांना जाणवला. मेडाग्लीया तावडतोब वर आला. या सपाटीवर सामान्यत: तो प्लॅटफॉर्म ओलांडून पलीकडे जातो व दुसरी शिडी चढूं लागतो. ती शिडी ब्रीजकडे जाते. पण आतां त्याला प्लॅटफॉर्मवरच उभा असलेला मी पाहिलं. हात कमरेवर होते व शिडीच्या छोट्या झडपाकडे तो पहात होता. कारण बर्फाच्या मोठमोठ्या खड्यांनीं झडप पक्कें बंद झालें होतें.

मोठी पहार घेऊन येण्यासाठीं मी मोठ्यानं हांक मारली. आणि थोड्याच वेळांत एका धष्टपुष्ट माणसानं तें अडथळा आणणारं बर्फ दूर करावयास सुरुवात केली. नंतर शिडीनं मी वर गेलों, कित्येक बर्फाचे ठोकळे दूर केले आणि नंतर एकाच्या माथ्यावर चढून दृश्य पाहूं लागलों.

गेल्या उन्हाळ्यांत इथें फिकट निळीं वितळलेलीं तळीं होतीं. उघड्या पाण्याचे काळेशार पट्टे होते पण आतां इथें त्यापैकीं कांहीं नसून फक्त संपूर्ण शुभ्रता होती. क्षितिजापर्यंत पोचलेल्या गोठलेल्या अवाढव्य शुभ्रतेच्या मध्यांतून स्केटची काळी डोलकाठी वर आली होती. वारा मुळींच नव्हता तरीहि थंडी कडाक्याची व चावरी होती. बर्फाच्छादित पांढऱ्या शुभ्र पृष्ठभागावर दक्षिणेच्या बाजूनं सुंदर, मुलायम असं जांभळट गुलाबी आकाश होतं आणि तिथल्या गोठलेल्या क्षितिजावरून सूर्य डोकावत होता. जिवंत प्राण्याचं अस्तित्व कुठेंच दिसत नव्हतं, आणि वारा वहात नसल्यामुळें सभोवारचं असीम सौंदर्य होतं तसंच होतं.

मेडाग्लीया माझ्या शेजारीं पुलावर आला आणि हा बडबड्या तरुण माणूस नि:शब्द उभा राहिला. आमच्यापैकीं कुणीच काहीं बोलेना. सभोवतालच्या असीम सौंदर्याचा आम्हांला जो साक्षात्कार होत होता तो शब्दांनीं व्यक्त करायचं सामर्थ्य आमच्याकडे नाहीं याची आम्हांला जाणीव होती.

शेवटी टाक्या आणखी रिकाम्या करा असा गायला मी हुकूम दिला. लांबलचक स्केटवर जें बर्फ होतं त्या बर्फाला खालच्या बाजूनें स्केट दाबूं लागली. बर्फामध्यें उंचवटे आल्यासारखे दिसले. नंतर टाक्यांमध्यें जरी हवा भरली जात होती तरी जहाज वर येण्याचं थांबलं. मी विचार केला, थांबण्याची बहुधा हीच जागा असावी. आपण स्केटला इथं अशीच ठेवूंया. पण नाहीं—आम्ही जे इकडे आलो आहोंत तें पृष्ठभागावर येण्याचा प्रयत्न करण्यासाठीं म्हणून. तेव्हां वाटेल तें झालं तरी पृष्ठभागावर हें यायचंच.

आणि नंतर एकाएकीं पूर्वसूचना न देतां एखाद्या प्रचंड सुरीप्रमाणें स्केट बर्फ कापीत वर आली. बर्फाच्या प्रचंड ओझ्याखालीं भेलकांडत ती वर आली. सुकाणूच्या भागानें स्वत:साठीं भोक पाडून व्यवस्थित जागा केली होती. बर्फांतून वर आलेलं सुकाणूं म्हणजे प्रचंड अशा शार्क माशाचं शेपूट आहे असं वाटे. जहाजाच्या कडेला कुठेंच उघडं पाणी दिसत नव्हतं. बर्फच होतं. त्यामुळें जहाज आजुबाजूला सरकण्याची भीति नव्हती. जिथं आम्ही आहोंत तिथंच उभे रहाणार होतों.

बिल् लेमन माझ्याशेजारीं पुलावर येऊन उभा राहिला. क्षणभर स्तब्ध राहिला व मग म्हणाला कीं मी काहींतरी गरम कपडा घालावा. तेव्हां कुठें माझ्या लक्षांत आलं कीं उत्कंठेच्या भरांत अंगात एक साधा —'पार्का' साधा लोकरी कोट—घालू मी इथं आलों होतों व म्हणून क्षणाक्षणाल मला जास्त जास्त थंड वाटत होतं. इथर उष्णतामान शून्याच्या खालीं वीस डिग्र होतं.

मी परत लौकरच ब्रीजवर आलो अगडबंब अशी तुमान, रबरी रोगण अस लेलं नायलॉनचं जॅकेट आणि डोक्याव हेल्मेट. पुष्कळशीं माणसं पहारी घेऊ डेकवरील बर्फ साफ करीत होती. स्केटच्य धाव्यावरून घसरत बर्फात उतर अगदींच सोपं होतं. तसा उतरून मं मागच्या बाजूस सुकाणूं पाहायला गेले तें जहाजाच्या मागें पंधरा फुटांवर बर्फाव डोकावत होतं. त्या भागाचं किंवा जहाजाच्य इतर कोणत्याच भागाचं नुकसान झा नव्हतं. व्हेल माशाच्या पाठीच्या आकाराच आमच्या स्केटचा डोलकाठीचा भा काहींहि मोडतोड न होतां बर्फाच्या थराच दणका सहन करूं शकला होता. नंतर फक बर्फाला सावकाशीनं जोर लावीत तं मोकळीक मोठी करून संपूर्ण जहाज व आणायचं काम सोपं झालं होतं.

उत्साहीत होऊन जहाजापासून दू जाऊन जहाज कसं दिसतं तें मी पा लागलों. जमिनीपासून दूर आणि आपल्य जहाजापासून लांब जाऊन तें कसं दिसतं पहाण्याचं भाग्य फारच थोड्या कप्तानांच्य नशिबीं असतं. पांढऱ्याशुभ्र केकवर रंगी चॉकलेट ठेवावं तशी जहाजाची काव डोलकाठी कुणीतरी हळुवार हाता शुभ्र अशा बर्फावर ठेवली आहे असं वा आतां ती इथून परत हालेल—दूर जाई हें खरंच वाटेना—पटेना.

मी परतलों तेव्हां आमच्या नौदला फोटोग्राफर लेफ्टनंट ब्रूस मीडर हा खा बर्फावर जाण्याच्या तयारींत होता. ब्रू हा अंगानें दांडगा तरुण असून, त्याच्य जाड आर्क्टिक्ट पेहरावांत एखाद्या गुबगुबी अस्वलासारखा दिसत होता. त्याच्य दोन्ही खांद्यावरून कॅमेरे लोंबकळत हो कॅमेरानां धक्का न लागतां स्केटच्या धाव्य वरून खालीं घसरत बर्फावर जाण्या त्याची कसरत चालली होती. 'ब्रू















राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

भरपूर छायाचित्रें घे वरं का ! नाहींतर आपल्या या सांगण्यावर कुणाचा विश्वासहि बसणार नाहीं!' मी त्याला सांगितलं.

'तुम्ही काय म्हणतां तें समजलं.' इतरांसारखाच आश्चर्यमुग्ध नजरेनं आजुबाजूला पहात तो म्हणाला.

नंतर जेव्हां त्यानें आपले थंडगार झालेले कॅमेरे जहाजाच्या आंतील गरम वातावरणांत आणले तेव्हां हवेंतील ओल त्यांना चिकटून थिजलं. मिनिटभरांत त्यांचे ते शोभिवंत लेका व नायकॉन कॅमेरे जुन्या काळच्या रेफ्रिजिरेटरप्रमाणें पांढऱ्या बर्फानें वेष्टिले गेले.

त्या दिवशीं सायंकाळीं पांच वाजतां जेव्हां आम्ही परत समुद्राच्या पोटांत गेलों, तेव्हां टेलव्हिजन पडद्यावर सिगारच्या आकाराची बर्फांतील पोकळी दिसली. तो बरोबर स्केटचा आकार होता.

आम्ही उत्तर ध्रुवाच्या दिशेनें प्रवास सुरू केला. आणि सर्व रात्रभर, आम्ही उत्तरेच्या दिशेनं जात असतां बर्फ-शोधक यंत्रावर व टेलव्हिजनवर, पृष्ठभागावर पातळ बर्फाचा थर दिसतो काय, हें पाहण्याचें यत्न फोल ठरले. बरोब्बर उत्तर ध्रुवावर पृष्ठभागावर येण्याचे आमचे बेत अयशस्वी होणार असें वाटलें.

सर हर्बर्ट विल्किन्स यांच्या रक्षेच्या विसर्जनाविषयीं मी माझ्या हाताखालील माणसांकडे कांहीं बोललो नव्हतों, कारण तें काम कितपत पार पाडतां येईल याविषयीं मी स्वतःच साशंक होतो. तरीहि सतरा तारखेला सकाळीं-जेव्हां आम्ही उत्तर ध्रुवाच्या जवळ आलों तेव्हां-ध्वनिक्षेपकावर ही गोष्ट मी साऱ्यांना सांगितली, व रक्षा विसर्जन करण्याची आमची उमेदही व्यक्त केली. आम्ही उत्तर ध्रुवावर पोचल्यावर सावकाशीनं तिथल्या आजुबाजूच्या प्रदेशांत फिरून जवळपास वर येण्याचा प्रयत्न करायचा. वरील बर्फाचं आवरण दर दिवसाला अडीच मैलांच्या गतीनं सरकत होतं तेव्हां जुन्या बर्फाच्या जागीं येणारं नवं बर्फ कदाचित अधिक पातळ आणि आमच्या उपयोगाचं असण्याची शक्यता होती. आर्क्टिक्टमधील विवक्षीत भौगोलिक ठिकाणीं जर पाणबुडी वर नेण्याचा आमचा प्रयत्न यशस्वी झाला तर तें सैनिकी उद्दिष्टांच्या दृष्टीनें महत्वाचं ठरणार होतं. सरकत्या आल्फा स्टेशनचं तसं नव्हतं. बर्फाबरोबर बर्फाच्या गतीनें तें सरकत होतं.

चहापान करतांना आम्ही गप्पा मारीत होतों व या पातळ बर्फाच्या महत्वपूर्ण भागांना काय म्हणावं याचा विचार करीत होतों. खरं म्हणजे तें नवीन तयार झालेलं बर्फाचं आवरण. पण इतकं लांबलचक नांव कांहीं शोभत नाहीं. डॉक्टर लायन म्हणाले 'आपण त्याला 'स्कायलाइट'-झरोक्याची कांच-म्हटलं तर ?

तें तसंच दिसत होतं. काळ्या छपरांत हिरवी-निळी काच बसवल्यासारखे ते दिसत होते. 'स्कायलाइट' हें नांव यथार्थ होतें.

पण जसजसे आम्ही ध्रुवाच्या जवळजवळ जाऊं लागलों तसतसे 'स्कायलाइट्स्' कांहीं आम्हांला दिसेनात. आम्ही अतिशय सावकाशीनं जात होतों. शेवटीं विल् लेमन यानं आमचं जहाज अशा ठिकाणी आणलं कीं जेथून प्रत्येक दिशेनं दक्षिण दिशाच दिसत होती. स्केट परत एकवेळ ध्रुवावर आली होती.

माझ्या खलाशांना उद्देशून मी एक छोटं निवेदन केलं. मी म्हणालों कीं बरोबर पन्नास वर्षांपूर्वी सहा एप्रिल एकोणिसशें नऊ रोजीं रॉबर्ट पेरी हा गृहस्थ प्रथम उत्तर ध्रुवावर पोचला. आपल्यापेक्षां त्याची परिस्थिति किती निराळी ! त्याच्याबरोबर चार एस्किमो व त्याचा नोकर मॅट हेन्सन हेच फक्त होते. पेरीला त्याच्या सफरींमध्यें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं शास्त्रीय अद्यावत् उपकरणांची मदत नव्हती. त्यानीं साध्यासुध्या उपकरणांनी अंतर मोजून आणि सूर्याचे निरीक्षण करून आपण कुठें आहोंत तें ठरविलं. आपण ध्रुवावर पोचलों याची पॅरीची जेव्हां खात्री झाली तेव्हां त्यानें तेथें झेंडे फडकावले व छायाचित्रें घेतलीं. आणि नंतर थोड्याच तासांत आर्क्टिक्टच्या 'सरकत्या बर्फानं त्याचे ते झेंडे वाहून दूर नेले. कीर्तिची सरकत जाणारी पताका !

आमच्या नौदलविषयक शास्त्रीय ज्ञानामुळें अगदीं थोड्या त्रासांत आम्ही उत्तर ध्रुवावर येऊन पोचलों होतों हें खरं. पण आज समुद्राच्या पृष्ठभागावर येणं ही सर्वस्वी अलाहिदा गोष्ट होती. कारण इथं 'स्कायलाइटचा' तर मागमूसहि दिसत नव्हता. आमचं जहाज बरोबर ध्रुवावर समुद्राच्या पृष्ठभागाखाली दोनशें फुटांवर उभं होतं. मी पेरिस्कोप वर केला. पण वरील बर्फातून किंचितहि उजेड दिसेना. आम्ही आंत बर्फाखालीं बंदिस्त होतों.

आम्ही आमचा तपास आजुबाजूला फिरून सुरू केला. त्यावेळीं जहाजाची गति अतिशय कमी होती व पेरिस्कोप व बर्फशोधक यंत्र आणि टेलव्हीजन या साऱ्यांची मदत आम्ही घेत होतों. पण आमचं नशीब आम्हांला साथ करीना. मग मी विचार केला कीं प्रयत्न चालू ठेवणं एवढंच आपल्या हातीं. अशा फिरण्यांत आमचे कित्येक तास गेले पण कांहीं उपयोग नाहीं.

आणि नंतर मग आम्हांला तो 'झरोका' दिसला. पहिल्या प्रथम पाचूसारखी हिरव्या रंगाची किंचित् शलाका पेरिस्कोपमधून दिसली. आमच्या जहाजाच्या दृष्टीनें विचार करतां ती फारच लहान होती, पण प्रयत्न करून पहावयास कांहीं हरकत नव्हती. आम्ही अत्यंत काळजीपूर्वक स्केट त्याखालीं आणली. बर्फ-शोधक यंत्रानें वरील बर्फ पातळ असल्याची ग्वाही दिली.

गेल्या उन्हाळ्यापेक्षां आतांच्या हा खेळ सर्वस्वी निराळा होता. इथं आमच्यावर पातळ बर्फाचा थर होता आणि तो इतका लहान होता कीं पेरिस्कोपमधून तो एकाच वेळीं दिसत होता-त्याची सर्व लांबीरुंदी पहातां येत होती. त्याच्या काठाकाठानें काळ्या रंगाचे सरकत्या बर्फाचे तीक्षण थर होते. गेल्या उन्हाळ्यांतील सफरीमुळें आमच्यामध्यें आत्मविश्वास

अनुक्रमणिका

निर्माण झाला होता, अन्यथा असं धोक्याचं काम करायला आम्हांला धाडस झालं नसतं.

आम्ही शंभर फूट वर आलों. वरील स्कायलाईट कुत्र्याच्या पायाच्या आकाराचा होता आणि धोकादायक वाटावा इतका लहान होता. अशा तऱ्हेचा प्रयत्न यापूर्वी आम्ही कधींच केला नव्हता. तें कसंहि असलं तरी जर का हें बर्फ फोडून एकदाचे आम्ही वर गेलों तर तिथें वरती 'स्केट' घट्टपणें उभी राहील आणि ती मग जिकडे तिकडे तरंगत जाण्याची बिलकूल भीति उरणार नाहीं. 'बर्फाला धडक देण्याच्या तयारींत रहा—स्केट वर आणा.' मी म्हणालों.

आम्ही वर जावयास सुरुवात केली असेल नसेल तोच बर्फ–शोधक यंत्राकडे उभा असलेला केहन ओरडला 'आपल्या डोक्यावरती बर्फाचा जाड थर आहे—वारा फुटांहूनहि जास्त जाड.'

काय झालं तें माझ्या लक्षांत आलं. बर्फ सरकत होतं आणि आमच्या माथ्यावरील 'स्काय लाईट' स्केटपासून दूर जात होतं.

'गाय पाणबुडी खालीं घे.' मी सांगितलं. आणि क्षणार्धात स्केट काळाकुट्ट समुद्रांत खालीं जाऊं लागली. धीर न सोडतां आम्ही परत एकदां वर यायचा प्रयत्न केला, पण परत आमचं गणित चुकलं.

'आपण असं करूं या.' विल् लेमन म्हणाला. 'आपण जेवढ्या वेळांत वर येऊं तेवढ्या वेळांत आपल्या माथ्यावर कुठंचं बर्फ येईल तें मोजूंया, म्हणजे जेव्हां निश्चित पातळ बर्फ वर येईल तेव्हां आपण धडक देत असूं.' आणि त्यानें झटपट आकडेमोड केली. आम्हांला वर येण्यासाठीं योग्य वेळ कोणती तें शोधून काढलं. मोठ्या कष्टानं स्केट वर येण्याच्या पावित्र्यांत उभी राहिली.

परत आम्ही वर यायला सुरुवात केली न केली तोच केहननें आमच्या माथ्यावर जाड बर्फ असल्याचं सांगितलं. जहाजाचा अगदीं वरचा भाग बर्फ खंडाच्या खालीं पन्नास फुटांवर होता, त्यामुळें पेरिस्कोप खालीं करणं मला भाग पडलं. पेरिस्कोप खालीं केल्यामुळें आमचा जणुं काय एक डोळा बंदच झाला होता, दिसत होतं काय तें फक्त टेलव्हीजनच्या पडद्यावर. तिथें प्रचंड बर्फाची वाकडी तिकडी रेषा दिसत होती.

आतां पाणबुडीचा वरचा भाग बर्फापासून अवघ्या पंचवीस फुटांवर होता. "मोठं जाड बर्फ—अजूनहि मोठं बर्फ.' केहन सांगत होता. त्याच्या आवाजांतील तंगपणा स्वच्छ कळत होता.

तिथं थांबायला क्षणाचीहि उसंत नव्हती. 'पाणबुडी झटकन् खालीं घ्या.' मी ओरडलों. लगेच शॅफरनं टाक्यांची झाकणं उघडलीं—आंत टनावारी पाणी गेलं व आंतील हवा बाहेर आली. त्या बाहेर पडणाऱ्या हवेचा झोत माझ्या कानावर आपटला. बर्फाच्या प्रचंड कड्यांपासून आम्ही झटक्यांत दूर झालों.

'दाखविलेल्या खुणेपेक्षां जास्त पाणी टाक्यांत घेऊं नका.' शॅफरनं हुकूम सोडला. भराभर खालीं जात असलेल्या स्केटचा तावा हातांत ठेवण्यासाठीं तो असें म्हणाला. खोलींत येण्याच्या हवेच्या दावाचा 'रों रों' आवाज खोली भरून राहिला होता.

'आपण सांगितल्याप्रमाणं केलं आहे' डोर्नबर्ग म्हणाला.

'पाणी आंत घेणं बंद करा. जादा पाणी पंपानें बाहेर समुद्रांत सोडा.' गाय म्हणाला. हळूहळू आमची खालीं जायची गति कमी झाली व शेवटीं आमच्या अपेक्षेपेक्षांहि जास्त खोलवर जाऊन आमची स्केट स्तब्ध झाली.

माझ्या तोंडावर घर्मबिंदु जमा झाले होते. आणि स्केटवरील प्रत्येकाच्या चेहऱ्यावर अस्वस्थता दिसत होती. दृढनिश्चयानें आम्ही परत भ्रमंति चालू केली.

या झरोक्याच्या दोन्ही बाजूस फार दाबाचे कडे आहेत. फक्त कुत्र्याच्या पायाच्या आकाराच्या कोपऱ्याला तसे कडे नाहींत.' अल् केहन म्हणाला.

विल् लेमननं परत एकवेळ आवश्यक तीं गणितं केलीं. मधांच्या चुका त्यानं सुधारल्या होत्या. कुत्र्याच्या पायाच्या आकाराच्या कोपऱ्याला पाणबुडी वर घ्यावी म्हणजे अल् केहन म्हणाला ते दाबयुक्त बर्फाचे कडे आड यायला नकोत, मी ठरवलं. टाकींतील पाणी ज्या मंद गतीनं बाहेर जात होतं त्याच मंद गतीनं जहाज वर येत होतं.

'जाडजूड—अजूनहि जाडजूड बर्फ' अल् केहनचा आवाज घुमत होता. याचा अर्थ पेरिस्कोप खालीं करायचा.

'पातळ बर्फ—ती पहा उघडीक, छान दिसते.' अल् आनंदानें उद्गारला.

टेलव्हीजन पडद्यावर आम्ही फार जवळ आल्याचं कळलं. आम्ही सारं बळ एकवटून बर्फाला तडाखा दिला व बर्फ फोडलं.

'गाय पाणबुडी खालीं जाऊं देऊं नकोस.' मी त्याला धोक्याची सूचना दिली. एखाद्या अतिशय उंच गिरीशिखराच्या टोकावर एक पाऊल ठेवून तें तिथेंच कसेंबसें रोवूं पाहणाऱ्यासारखी माझी स्थिति झाली होती. आंधळ्याप्रमाणं अंदाजानं वर जायला मी बिचकत होतों. परंतु पेरिस्कोप फक्त पांढरा रंग दाखवीत होता. त्याच्या काचेवर बर्फाचा थर जमला होता.

मी स्थितिदर्शक यंत्राकडे पाहिलं. आम्ही सुव्यवस्थित स्थितींत होतों. जर का इथलं बर्फ फोडून आम्ही वर येऊं शकलों तर इतिहासांत आमची कर्तबगारी नोंदली जाईल. 'ध्रुवावर वर जायच्या तयारींत रहा.' मी माइकवर सांगितलं.

माझ्या माणसांनीं झटपट तयारी केली व शफर माझ्याकडे पहात हंसत म्हणाला 'ध्रुवाकडे पृष्ठभागावर जाण्यासाठीं तयार आहोंत'

आम्ही टाक्या सावकाशीनं रिकाम्या केल्या व अडखळत, थांबत स्केट वर जाऊं लागली. अद्यापहि आम्ही फार मोठ्या अशा बर्फाखालीं होतों. या बर्फांत इथं आम्ही अनंत कालपर्यंत रहाणार कीं काय असं वाटूं लागलं. पण नाहीं. काहीं वेळानंतर स्केटचा वरचा डेक बर्फाच्या वर आला. आतां दरवाजे उघडणं शक्य होतं.

'दरवाजा उघडा' मी ओरडलों, आणि शिडीकडे धांवत गेलों.

मी ब्रीजवर उडी मारली आणि आर्क्टिकमधल्या वाऱ्याचा प्रचंड झोत माझ्या अंगावर आला. त्या उघड्या










ब्रीजवर तो वारा थैमान घालत होता–घोंघांवत होता. वर्फाचे तीक्ष्ण कण तो वारा स्वत:वरोवर नेत होता. सोसाटयाच्या वाऱ्यावरोवर वहाणाऱ्या वाळूच्या कणांनीं अंग झोंबावं तसं त्या तीक्ष्ण वर्फानें अंग झोंवत होतं. करडया रंगाचे भरघोस ढग आकाशांत लोंवकळत होते. जणू काय संधिप्रकाशांत वादळ सुरू झालं आहे व रात्र येणार आहे असंच वाटे.

'कुत्र्याचा पाय' जिथं वळला होता, वरोवर त्या तिथंच वर्फ फोडून आम्ही वर आलों होतों. ती उघडीक अरुंद आणि खडबडीत होती आणि तिच्या दोन्ही बाजूला अठरा फूट उंचीचे वर्फाचे प्रचंड कडे होते. इतका उंच वर्फखंड आर्क्टिक्ट महासागरांत आम्ही अद्यापपर्यंत पाहिला नव्हता.

वर येण्याचा मार्ग स्वच्छ दिसत होता. टाक्या संपूर्णपणें मोकळया केल्या तेव्हां वंदुकीच्या वारांसारखा आवाज झाला व वर्फ दुभंगून स्केट वर येऊं लागली. शेवटीं स्केट पृष्ठभागावर आली. उत्तर ध्रुवावर अगदीं वरोवर मध्यावर येणारं इतिहासांतलं हें पहिलं जहाज. इथनं कुणीकडेहि पहा–एकच दिशा–दक्षिण. आपल्या या पृथ्वीचा गोल आमच्या पायाखालीं वर्तुळाकार फिरत होता. गेल्या शंभर वर्षांत शूर धाडसी लोकानीं उत्तरध्रुव पादाक्रांत करण्याचा प्रयत्न केला–त्यासाठीं बलिदान केलं आणि आज त्या उत्तरध्रुवावर शास्त्रीय उपकरणांनीं सुसज्ज अशी पाणबुडी पोचली आहे.

हें सारं सहजासहजीं का? आम्ही फार लौकर आणि कमी श्रमांत यश संपादन केलं याचा, पन्नास वर्षांपूर्वींच्या त्या शूरांना राग आला असेल का? उत्तर ध्रुवावर आल्यावर आपणाला काय वाटलं याचं वर्णन पेरीनें आपल्या दैनंदिनीत लिहिण्याचा प्रयत्न केला. पण त्याला तें जमलं नाहीं. तो साफ दमला होता. मागावून तो लिहितो:

देह आणि मन बिलकूल न थकतां जर का मानवाला ९० अंश उत्तर रेखांशावर जाणं शक्य झालं तर अनुपम असा, पूर्वी कधींहि न अनुभवलेला असा आनंद त्याला उपभोगावयास मिळेल . . . पण हा उत्तरध्रुव मानवाला सहजासहजीं तिथं जाऊं देणारं नाहीं. तो त्याची कठोर कठोर परीक्षा घेईल.

बाहेर वर्फावर एक चक्कर मारून आल्यावर वॉल्ट विटमन मला म्हणाला कीं आजुवाजूचं वातावरण त्याला काहीं वरोवर दिसत नाहीं. तीक्ष्ण झोंवणारा वारा वहात होता, तेव्हां वर्फाची जोरदार हालचाल होण्याची दाट शक्यता होती. तेव्हां आवश्यक तेवढया वेळापेक्षां एक क्षणभरहि जादा न थांवतां पाणवुडी खालीं न्यावी.

आम्ही लगेच अस्तिविसर्जन समारंभाच्या तयारीस लागलों. सर हर्बर्ट हे ऑस्ट्रेलियांत जन्मले आहेत, त्यानीं कर्तृत्व गाजवलं होतं तें इंग्लंडमधें आणि शेवटीं ते अमेरिकेंत स्थाइक झाले होते. आम्ही स्केटवरून तिन्ही राष्ट्रांचे ध्वज फडकावले, वाऱ्यावर फडफडणाऱ्या त्या ध्वजांचं दृश्य मोठं उमदं होतं

जहाजाच्या बाजूच्या वर्फावर एका छोटया टेवलावर आम्ही ब्राँझचा रक्षा–करंडक ठेवला. त्याच्या दोन्ही बाजूला जवळ जवळ तीस खलाशी रांगा करून उभे राहिले. उष्णतामान शून्याच्या खालीं सव्वीस अंश होतं. आम्ही स्केटच्या आडोशाला उभे होतों तरीहि आमचे उच्छास आमच्या हनुवटीवर यतांच त्याचं पांढरं वर्फ होई व तें तेथेंच अडके. आमच्या नाकातोंडांत वहात्या वाऱ्यानें वर्फ जात होतं आणि त्यामुळें श्वासोश्वास करणं जड जात होतं. काळोख होता तेव्हां आमच्या लोकानीं दोन्ही बाजूला तांवडे दिवटे धरले होते. वाऱ्यानें वहाणाऱ्या वर्फामुळें तो चकाकता तांवडा उजेड विलोभनीय दिसत होता व या अवनीतलावर दिसणारी एक निराळीच शोभा दिसत होती.

उरलेले खलाशी डेकवर रांगेनें उभे राहिले. वंदुकधारी खलाशांचं एक पथक नावेजवळ उभं होतं. प्रार्थनेचं पुस्तक हातांत धरून तें वाचणं, कडाक्याच्या थंडीनें जवळजवळ अशक्य होतं. तरीहि मी वाचूं लागलों.

'I am the resursection and the Life saith the Lord: he that believth in me thought he were dead, yet shall he live and whosoever liveth and believth in me, shall never die . . .'

नंतर थोडक्या शद्बांत सर हर्बर्ट यांची माहिती मी सांगितली. 'आज रोजीं या शतकांतील एका मोठ्या वीराला आपण वंदन करीत आहोंत. त्यानं अत्यंत उदात्त असं कार्य केलं आहे, तें म्हणजे मानवी मनाचं क्षितिज रुंदावणं, त्यानं स्वत:च लिहिलेली प्रार्थना मी आतां वाचून दाखवतों.

'आकाशांतल्या वापा तूं आम्हांस स्वातंत्र्य द्यावेंस पण उच्छृंखलपणा देऊं नकोस. मानवाचं भलं करण्याचं सामर्थ्य द्यावेंस, पण त्या ताकदीचा स्वत:साठीं स्वार्थी उपयोग करण्याची वुध्दि देऊं नकोस.'

लेफ्टनंट वॉयड् यानें तें ब्राँझचें पात्र उचललं व तो, त्या मागून मी व माझ्यामागें दोन मशालजी असे सर्वजण आम्ही जहाजापासून तीस यार्ड दूर गेलों. मी म्हटलं 'हे सर्व शक्तिमान परमेश्वरा आमच्या दिवंगत बंधूचा आत्मा आम्ही तुझ्या स्वाधीन करतों आणि त्याची रक्षा सागराकडे सोपवतों !

डेवनें तें रक्षापात्र घेतलं व आंतील रक्षा चारी वाजूला शिंपडली. अर्धवट काळोख आणि गरगर फिरणारं वर्फ यांत ती रक्षा क्षणार्धात लुप्त झाली. मृताच्या शेवटच्या सन्मानार्थं रायफलींच्या फैरी तीन वेळां झाडल्या गेल्या. सर हर्बर्ट विल्किन्स हे आपल्या शेवटच्या इच्छित मुक्कामाव्र पोचले होते.

त्या रात्रीच्या जेवणाच्या वेळीं वातावरण गंभीर होतं. मधांचा प्रसंग हा केवळ सर हर्बर्ट यांचा सन्मान नव्हता तर उत्तर ध्रुव पादाक्रांत करण्यासाठीं ज्यांचे ज्यांचे देह कारणीं पडले त्या सर्वांचा सन्मान होता.

त्या रात्रीं आम्हीं वर्फाचा लहानसा चौथरा बांधला व त्यावर एक पोलादाचा स्तंभ रोवून त्यावर अमेरिकेचा राष्ट्रध्वज लावला. एका जलाभेद्य पेटींत स्केट उत्तर ध्रुवावर पृष्ठभागावर आल्याचं वर्णन लिहिलेला कागद ठेवून ती पेटी त्या खालीं पुरली. योग्य वेळीं जेनेट जहाजाच्या अवशेषांप्रमाणें ही पेटी बहुधा दक्षिणेकडे वहात जाईल व ग्रिनलंडच्या किनाऱ्यावर लागेल.

विटमनला भीति वाटली होती तशी वर्फाची काहीं हालचाल दिसेना. पण वादळाचा जोर वाढला होता व उष्णतामान खालीं खालीं जात होतं. आतां समुद्राच्या पोटांतील उष्णतेचा आसरा घेणं चांगलं. तो वेळ आला होता.

परत एक वेळ सर्व सूचना केल्या गेल्या. व टाक्या उघडल्या. त्यांत पाणी भरूं लागलं व स्केट हळू हळू खालीं जाऊं लागली. वारा घोंघावत होता व घट्ट बसलेल्या स्केटच्या टेकडावर आपटत होता. थोडयाशा अंतरावरून पेरिस्कोपमधून शेवटीं मला दिसलं तें अमेरिकेचं निशाण. तें मोठ्या अभिमानानें वाऱ्यावर फडफडत होतं.

[क्रमशः]







अनुक्रमणिका



# आधीं सांगितलें मग केलें

**—वसंत पोतदार**

"आकाशवाणी झाली आहे कीं, मीच जिंकणार ! मी – कॅशियस क्ले ! मी त्याला पाकळीसारखा फुंकून टाकीन ! मी वाळूसारखी त्याची भुकटी करून टाकीन !—"

कॅशियस मार्सेलस क्ले

असें म्हणाला. आधीं त्यानें सांगितलें. किती तरी आधीं ! आणि केलेंहि !

"**आकाशवाणी** झाली आहे कीं, मीच जिंकणार ! माझ्याइतका सर्वशक्तिमान महान महाकाय आणि मनोहर मुष्टियोद्धा इतरत्र सांपडणें मुष्किल आहे ! मी रणगाड्यासारखा राकट आहे; लिस्टन मजपुढें उकिरड्याचा गाडा आहे. मी त्याला लीलया लोळवेन, पाकळीसारखा फुंकून टाकेन. हो ! मी !! मी – कॅशियस क्ले – लिस्टनची वाळूसारखी भुकटी करून टाकेन. माझी वज्राघाती मुष्टि त्याच्या थोबाडावर थडकल्यानंतर तुम्ही त्याला मूठमाती देण्याच्या तयारीला लागाल, समजलांत ? असा आहे हा कॅशियस मार्सेलस क्ले!"

आपल्या विस्तीर्ण जबड्यांतून वरील फटाक्यांचे आवाज काढीत, आणि तसें काढून झाले कीं, तोंडाचा चंबू करून 'बोलेल तोच करेल' ह्या आत्मविश्वासाचा झगझगीत झोत आपल्या काळ्याकभिन्न चेहऱ्यावरील हावभावांतून दाखवीत, मियामी बीचच्या चौकांमध्यें अगर पांचव्या रस्त्यावरील एका दुमजली घरांतील मार्गदर्शक एंजिलो डंडीच्या आखाड्यांत २५ फेब्रुवारीच्या विश्वविजेत्या मुष्टियुद्धासाठीं चाललेली त्याची तालीम पहाण्यास, १ डॉलर खर्च करून आलेल्या लोकांसमोर क्ले कर्दनकाळासारख्या फेऱ्या घालीत असे !

लिस्टनचे असंख्य चाहते क्लेला तोंडाळ जंतू, वटवट करणारा पोपट अहंगंडाचा फुगा काय वाट्टेल ते मानीत. खुद्द लिस्टन मात्र चकार शब्द उच्चारीत नसे.

### क्ले 'ललना व पहिलवानां संगे'

त्या दिवशीं सुद्धां लिस्टनच्या मौनामुळें क्लेला फार क्लेश झाले. "जगज्जेता" किताबाचे मुष्टियुद्ध होणार होतें त्याच दिवशींची गोष्ट ! २५ फेब्रुवारी १९६४ ! सकाळची वेळ, वैद्यकीय तपासणीच्या सोपस्कारासाठीं लिस्टन व क्ले हे मानवी गेंडे आपापल्या गुहांतून इस्पितळांत दाखल झाले होते. आठ फक्कड गुलछबू छोकऱ्या व वस्ताद एंजिलो डंडी, भारतांत एका बालिकेनें 'नुदिनि' म्हटल्यापासून त्याच नांवानें ओळखला जाणारा वीस वेळा जगप्रवास केलेला मुष्टियोद्धा 'नुदिनि' ब्राऊन, लाईट हेवी गटाचा अजिक्य योद्धा विली पोस्टॅर्नो, लिस्टनशीं वजनाशिवाय इतर कशांतच साम्य नसलेला क्लेला युद्धाचा नियमित सराव देणारा हार्वे कोडी जोन्स, काळाशार हस्तक लुई सॅरिया आणि एक-दोन नवशिक्के गवदुल ठोसेबाज अशा ललना व पहिलवानांच्या कड्यांत एखाद्या दगडी सुळक्यासारखा सहा फुटांवर आणखी तीन इंच उंच असलेला काळा कॅशियस क्ले इस्पितळाच्या आवारांत आल्याबरोबर लिस्टनपासून पांच फूट अंतरावरउ भा राहून अक्राळविक्राळ गर्जना करूं लागला.

"तूं कसला आला आहेस विक्रमी योद्धा ! म्याड.... बांगरू !! मी तुला बडवीन, कुटीन, ठेचीन, ठोकीन, चेंचून टाकीन. हं! आचमनासारखा प्राशन करून टाकीन.... अगदी पत्ते पिसतात तसा पिसून काढीन."

"हिस्टेरिया"– न्यूयॉर्क टाइम्सचा वार्ताहर

आँर्थर डले.

"शिजोफ्रेनिया"— न्यूयॉर्क पोस्टचा समीक्षक मिल्टन ग्रॉस.

तज्ञ मंडळी असले शेरे मारीतच होती इतक्यांत क्ले लिस्टनच्या पुढ्यांत २ फूटांवर येऊन पातला. २ फूट अंतरावरून व २ इंच उंचावरून (लिस्टन ६ फूट १ इंच) त्यानें लिस्टनच्या नांवें होळीच्या वोंवा मारणें चालूं ठेवले.

### क्ले 'किस झाड की पत्ती' — लिस्टन

ढवळ्या रंगाची पाटलोण, वर निळ्या रंगाची कापशी कापडाची विलायती बंडी व डाव्या हातांत एक वांवूची भरीव काठी घेतलेला क्ले इतका जवळ आला तरी लिस्टन संपूर्ण वेफिकिरीनें उभा होता. त्यामुळें क्लेचे डोकें ज्वालामुखीसारखें भडकलें. बोटें वळून ठोसा मारण्यासाठीं त्यानें उजवा हात वरपर्यंत उगारला. पण हनुवटीवर लोहाराचा घण आपटला तरी ज्याचे पाय भुईवरून किंचितहि डगमगूं शकणार नाहींत असा जगज्जेता सनी लिस्टन 'किस झाड की पत्ती' असल्या क्षुद्र आविर्भावानें क्लेकडे पहात जसाचा तसाच उभा होता.

### २५०० डॉलर दंड

कॅशियस क्लेच्या ह्या अतिरेकी अडाणीपणानें तेथें जमलेल्या हजारावर पत्रकार व अधिकाऱ्यांना श्रम लागण्याची पाळी आली. नगरपालिकेच्या पोलिसांनीं धांवत जाऊन क्लेचा भक्कम बाहू खालीं आणला. पूर्वीचा मिडलवेट चँपियन शुगर रे रॉबिन्सन पुढें सरसावला आणि त्याने क्लेचा क्रोध शांत करण्याची पराकाष्ठा केली. शेवटीं वॉशिंग्टन कमिशनचे अध्यक्ष मॉरिस क्लेन ह्यांनीं क्लेला निष्कारण दंगल माजविल्याबद्दल २५०० डॉलरची रक्कम भरण्याची शिक्षा ठोठावली.

### क्लेच्या नाडीची लय दुपटीनें वाढली

"क्ले मरणार ! लिस्टनच्या बुक्कीच्या भीतीनें त्याच्या पोटांत मृत्युगोळा उठला आहे. नाहींतर एरवी ५४ ठोके उडणारी क्लेची नाडी १२० पर्यंत गेली नसती." कमिशनचे डॉक्टर आलेक्झांडर त्यांनीं क्लेवर काळ ओढविल्याची भविष्यवाणी प्रसारित केली.

आणि दोघेहि आडदांड मुष्टियोद्धे वजनाच्या काटयांवरून उतरल्यावर सर्व उपस्थित मंडळीनीं डॉक्टर साहेबांचे भीषण ध्रुपद सामुदायिकपणें गायले. कारण कॅशियस क्ले लिस्टनपेक्षां तब्बल ७॥ पौंड हलका पडला ! सनी दोनशें अठरा तर कॅशियस दोनशें साडेदहा पौंड. वजनाच्या काटयानेंहि लिस्टनच क्लेचा कांटा काढणार असें मूक भवितव्य वर्तविलें !

### कुठे पॅटर्सन कुठे क्ले

१९६२ च्या सप्टेंबरच्या २५ ला पहिल्याच राऊंडमध्ये एकशें सव्वीस सेकंदांत सनीनें फ्लायड पॅटर्सनचा पाडाव केला तेव्हां सनी फक्त दोनशें चौदा पौंड व अजिंक्यपदाच्या २२ जुलै १९६३ च्या परतीच्या युद्धांत पुन्हां पहिल्याच राऊंडमध्यें १३० सेकंदांत पॅटर्सनचा फज्जा उडविला तेव्हां दोनशे पंधरा पौंड भरला होता. शिवाय पॅटर्सन गडी केवढा होता ! हरण केले गेलेले अजिंक्यपद इंगेमार जोहान्सनला अस्मान दाखवून परत मिळविलेला मुष्टियुद्धाच्या भारी वजनाच्या गटाच्या इतिहासांतील एकमेव योद्धा होता फ्लायड पॅटर्सन ! दोन–सव्वादोन मिनिटांत आपल्या पोलादी वादीसारख्या मुष्टीनें पॅटर्सनचा चेंदामेंदा करणारा सनी लिस्टन आतां क्लेशी खेळतांना आणखी अडीच पौंडानें फुगला होता. त्यामुळें "कुठे पॅट कुठे क्ले" असा एकाची तारीफ व दुसऱ्याची कींव करणारा मिश्र सूर मियामी बीचमध्यें घुमत होताच.

### बिचारा बिल !

युद्धाची घडी जवळ आली. क्लेच्या वायफळ वडबडीचा सर्वांत भयंकर परिणाम झाला तो ठेकेदार बिल मॅकडोनाल्डवर ! क्लेची खऱ्या अर्थानें वाळू होणार हें आकलन आगाऊच झालेले प्रेक्षक झुंज बघण्यास आले नाहींत. कन्व्हेन्शन हॉल स्टेडियमच्या १६४४८ जागा—२५ ते २५० डॉलरच्या तिकिटांमध्यें विभाजित केलेल्या—फक्त निम्यानेंच भरल्या. बिचारा बिल ! तीन लक्ष डालर्सच्या तोटयापेक्षां लिस्टनचे ठोसे त्याला परवडले असते.

### सनीसाठीं पोवाडे

"मी दुपारी क्लेला मेक्सिकोकडे जाणाऱ्या विमानांत चढतांना पाहिले"— एक प्रेक्षक.

"छाताडावर पलिस्तर. ठोकून क्ले इस्पितळांत आडवा पडला आहे."— दुसरा

असल्या अफवा वणव्याइतक्या झपाटयानें पसरण्यापूर्वींच कॅशियस मार्सेलस क्ले मुमु:कार करीत रिंगणांत येऊन थडकला. दुसरीकडे सनी लिस्टनचे घूड ओक वृक्षासारखे निश्चल उभे होते.

"सनी वाजी सर करणार.... छत्तीस पैकी फक्त एका युद्धांत पछाड खाल्ली आहे.... काय पण मॉर्टि मार्शलचा वचपा काढला आहे नंतर लिस्टनने.... लागोपाठ दोन वेळा मॉर्टिला मारला, नाहीं का?... क्लेपेक्षां दोन इंच ठेंगणा मात्र आहे... पण म्हणून काय झालं, त्याच्या ठोशाची पोंच तर ८४ म्हणजे क्ले पेक्षां दोन इंच जास्त नाहीं का ?.....आहो, मुष्टीची लांबी जास्त असल्यावर शारीरिक उंचीचे काय घेऊन बसलांत ?"— प्रेक्षक गात असलेले सनीचे पोवाडे.

"पण क्ले रोमच्या १९६० च्या ऑलिंपिक सामन्यांत १७८ पौंड वजनाच्या गटांतील अजिंक्य योद्धा होता मिस्टर ! एकोणीस पैकीं एकहि धंदेवाईक युद्ध तो हरले ल नाहीं.... आणि बावीस म्हणजे सनीपेक्षां सात वर्षांनीं लहान आहे हो"— कॅशियसची कड घेणाऱ्यांची कुजबूज.

युनायटेड प्रेस इंटरनॅशनलतर्फे लिस्टन-क्ले मधील धमाल धुमश्चक्री बघण्यासाठीं जमलेल्या ४६ क्रीडा वर्ताहरांची सामन्याच्या निकालाबद्दल मतें मागविली गेलीं. इन मीन तीन समीक्षकांनीं चिठोरीवर 'क्ले' हे एकाक्षर खरडले !

### इफ सनी विल मिक्स आय विल बीट हिम इन सिक्स

पहिल्या राऊंडचा गजर झाला. जगज्जेता चार्लस (सनी) लिस्टन, आव्हानकर्ता कॅशियस क्ले व पंच वार्ने फेलिक्स क्षणार्धांत युद्धामध्यें एकाग्रचित्त झाले. लिस्टननें ठोशांची झोड पुरविणें चालू केले. पण क्ले एखाद्या मनी मांजरीसारखा प्रहारांपासून सटकूं लागला. नंतर अचानक त्यानें चढाई पुकारली व लिस्टनच्या सीमेंट थापलेल्या कणखर टाळूवर लागोपाठ ८ आघात केले. एकच हल्लकल्लोळ उडाला. क्लेने आगाऊ जाहीर केलेलें आपलें युद्धतंत्र: 'फुलपाखरांसारखं उडायचं व मधमाशीसारखं डसायचं' अचुकपणें हाताळलं !

दुसऱ्या राऊंडमध्ये सनी चवताळला, बोटांमध्यें होणाऱ्या जखमेसारखा चिघळला. त्याने ठोशांचे बार सोडण्यांची सरबत्ती चालू केली.

प्रत्युत्तरांत क्लेने तिसऱ्या राऊंडमध्यें सनीच्या डाव्या डोळ्याखालून रक्त काढले. सनीच्या डोळ्यांवर चढलेले रक्तच जणुं त्याच्या काळ्या टीपकागदासारख्या गालांवर अश्रूंसारखे ओघळले.

सनीच्या विजयाचे पोवाडे गाणारे प्रेक्षक गरम सळीचा चटका बसावा तसे विव्हळूं लागले.

लिस्टनच्या रक्तानें माखलेल्या हातमोज्याने घाम पुसण्यांत क्लेच्या डोळ्यांत रक्ताचे कांहीं थेंब गेले. त्यामुळें चौथ्या राऊंडमध्यें त्यानें जवळ जवळ माघार घेतली.

पण पाचव्यांत त्यानें लिस्टनवर विव्या वाघासारखी झडप घातली. दोन काळे पहाड आतां एकमेकांस मुईसपाट करण्यांत मशगुल झाले. शेवटीं डाव्या मुष्टीचा पर्वताघात नाकाच्या शेंड्यावरच बसल्यानें लिस्टन खालीं कोसळला. आपलें नाक कापले जाण्याची त्याला कल्पना आली.

सहाव्या राऊंडमध्यें लिस्टन रक्तबंबाळ झाला. आणि सातव्या राऊंडच्या गजरावर त्याच्या पिछेहाटीचें प्रतिक म्हणून एक घामाटलेला, रक्ताळलेला टॉवेल फेंकण्यांत आला.

मागे एकदा क्ले म्हणाला होता, "इफ लिस्टन विल मिक्स, आय विल बीट हिम इन सिक्स."

वा ! कमाल आहे !!

आधीं सांगितलें..... मग केले !!! ★



# चंदेरी किनार



—वसंत देशमुख

## —विक्षिप्तपणा

**माणसांचा हा म्युझियम ! पहायला या ! खूप गंमती जमती आहेत इथं ! पैसे नाहींत ? नसूं द्यात. प्रवेश फुकट ! अगदीं 'फ्री'—येणार ना ?**

**अमर** चित्रकार मायकेल् एंजेलो रोममधील व्हॅटीकन् पॅलेसमध्यें आपल्या अमर कलाकृति साकार करण्यांत दंग होता. इतक्या उंचीवर, प्रशस्त छतांवर डोळ्यांच्या बाहुल्या वर करकरून तो एक दिव्य स्वप्न साकार करीत होता. शेवटीं त्याच्या डोळ्यावरहि परिणाम झालाच !

सोळाव्या चॅपेलमध्यें भितीवर एक भव्य चित्र आहे. हीं प्रचंड कामं चालली असतांना मायकेल् एंजलोंना एकच अट त्यावेळच्या धर्मगुरूंना घातली होती. जिथं हें काम चाललंय् तिथं कुणाची लुडबुड नको "अन् झालं का ?" "किती झालं ?" "केव्हां होणार", ह्या अशा चौकशा उपटसुंभांकडून नकोत ! धर्मगुरूनं ह्या अटी मान्य केल्या.

पण त्यावेळच्या धर्मगुरूचे सेक्रेटरी मधुनमधून त्या बंदिस्त प्रांगणांत पाऊल टाकून मायकेल्ला भंडावून सोडीत. शेवटीं त्यानं तें भव्य कार्य पुरं केलं. धर्मगुरु पहायला आले. त्या ख्रिस्तपुराणांतल्या तैल-चित्रांत मायकेलनं त्या सेक्रेटरीला अगदीं प्रामुख्यानं पुढंच चितारला आहे. स्वतःचं चित्र एका अमर कलावंतानं अमर करून ठेवलंय्. म्हणून सेक्रेटरीसाहेब हर्षोत्फुल्ल व्हायला हवे होते. पण ते नुसते तणतणत होते !

कारण मायकलनीं त्यांची छबी सहीसही बरोबर काढली—पण मुद्रेवर लावले गाढवाचे कान ! धर्मगुरुकडं ह्याची तक्रार केली त्या सेक्रेटरी साहेबानीं ! मायकल्ला ते कान मानवी करण्याची विनंति केली गेली. पण विक्षिप्तच तो ! तो कसला दाद देतो ? त्यानं सर्वांना धुडकावून लावलं ! मी जेव्हां ते गाढवाचे कान स्वतः पाहिले तेव्हां मलाहि त्या कलावंताविषयीं, त्याच्या अमर कलेविषयीं अन् त्याच्या श्रेष्ठ कलावंताला शोभण्यासारख्या विक्षिप्तपणाविषयीं, आदर शतपट वाढला !

पहिल्या युद्धाच्या समाप्तीचा काळ ! मुंबईंत एक नामांकित कसबी गृहस्थ गणपतीच्या मूर्ति अशा घडवीत कीं मांगल्यच साकार व्हायचं ! उंची रंग नि घोटीव हस्त-कौशल्य यांचा संगम सुरेख व्हायचा. हे दोन महिने असायचे मूर्ति घडविण्यांत मग्न ! बायकोला एकटीला बसून आला कंटाळा ! तेव्हां आपल्या नवऱ्याला सांगून ती चार आठ दिवस माहेरीं गेली—बाहेर गांवीं ! गणपति यायला अवकाश होते—म्हणजेच नवऱ्याला उसंत मिळायला अवकाश होता. तेव्हां बिचारीनं मुक्काम वाढविला. माहेरीं मुक्काम वाढवायला इथं तर सबळ कारण तरी होतं. पण स्त्रिया किती क्षुल्लक कारणांकरतां हे मुक्काम वाढवितात हे





अनुक्रमणिका

आपल्याला माहित आहेच !

ऊन होतं म्हणून, पाऊस पडला म्हणून, थंडी कोण कडाक्याची, अंगांत हुडहुडी भरायला लागली. नानांना बरं नव्हतं, आईला गरगरायला लागलं...वगैरे वगैरे ! अन् तें साहजिकच आहे !

इकडं आमच्या गणपतिकारांची बायको ठरल्या दिवशीं आली नाहीं. त्यांचा असा संताप झाला ? अपेक्षिलेल्या दिवशीं पत्नी घरीं आली नाहीं कीं पतीचा जो संताप होतो त्याची तीव्रता दुर्वास ऋृषि कधींच गांठूं शकले नसतील !

गणपतीचं जावळ रंगवितां रंगवितां त्यांनीं स्वत:चं डोकं खाजविलं ! एक तार खरडली.....

"XXX Expired. Start Immediately
( xxx वारले. तावडतोब निघा ! )

त्यांची पत्नी ! बिच्चारी ! आकाश फाटलं ! गरीब गाईसारखी हिंदु बाई ! धरणीवर गडबडां लोळूं लागली. वडिलांना घेऊन, दोन पोरं खेंचीत घरीं आली. सामसूम होतं. तिला वाटलं अरेरे ! यांचं अखेरचं दर्शन झालं नाहीं. आतां भयानक आयुष्य ! थरथरत्या, अश्रुमय अवस्थेंत ती आंत शिरली. आपला सौभाग्यमुकुट धुळींत पडला – हा विचार तिच्या मनांत येतो तोंच ती आपल्या यजमानाच्या खोलींत शिरली. एका मल्या मोठ्या गणपतीच्या मुकुटावर सोनेरी रंग सफाईनं लावण्यांत ते विचारे दंग होते.

मागं वळून पाहून मग ते शांतपणें म्हणाले, "या ! आलांत ! दुसरा उपायच नव्हता !"

जीवनाला विक्षिप्तपणाची चंदेरी किनार अत्यंत आवश्यक आहे. ती नसेल तर आयुष्य रखरखीत, रटाळ नि कंटाळवाणं होईल. जो तो आपापल्यापरीनं विक्षिप्तपणा करीत असतोच. एकतर त्याला आपण विक्षिप्तपणा केव्हां करतों हें कळत नाहीं अन् दुसरं म्हणजे विक्षिप्तपणाच्या अनंत परी आहेत, तऱ्हा आहेत, लकबी आहेत व हरकती पण आहेत !

माझे एक कविमित्र आहेत. चांगले अस्सल कवि ! एका संध्याकाळीं काव्यशास्त्रविनोदावर खमंग पोहे त्यांच्याकडं खात खात खमंग चर्चा करावी या उच्च उद्देशानं त्यांच्या घरीं गेलों.

त्यांच्या घरचं दृश्य पाहून मला अच
वाटला ! आठ ते दहा वर्षांची दहा
मुलं त्यांच्याभंवती बसलीं होतीं. मला व
ते त्यांना एखादी सुरेख गोष्ट खु
सांगित असावेत. जरा जवळून पा
तर काय ? उपमा नि उत्प्रेक्षांचा अक्ष
पाऊस पाडणारा हा कविराज त्या पोर
बरोबर एका वेगळ्याच उद्योगांत गर्क हं
खलबत्त्यामध्यें ते कांचा कुटत होते ! त्य
बारीक पूड स्वत: कुटीत होते.

"या वसंतराव ! योग्य वेळीं आल
कविराज !

"हें काय चाललंय् ?" अजून अ
बोध न झाल्यामुळं मी.

"अहो, संक्रांत जवळ आली ना ?
आमच्या बोळांतल्या पोरांची नि प
कडल्या बोळांतल्या पोरांची पतंग
कापाकाप करायची मोठी चुरस लागत
त्यांना उत्तम "मांज्या" करून देतोय् !

मी स्तब्धच झालों. त्यानंतर त्यांनी
कांचेची पूड धाग्याला सफाईनं लाव
कपाटावर रचून ठेवलेलं रंगीबेरंगी प
मला आस्थेनं दाखविले व पतंग कापाय
वेळीं हाताला हिसडा कसा द्यायचा अ
ह्याचं मला प्रात्यक्षिकच करून दाखविलं

लहानपणीं मी पतंग उडवायचा प्रय
केला होता. त्याची "कणी बांधणं" म
कधींच जमलं नाहीं. शेवटीं कंटाळून
तो धागा कसातरी बांधायचा व पहिल्य
फेरींत त्या पतंगाचं डिपॉझिट जप्त व्हायच

ह्या विक्षिप्त कवीराजांवर एक विक्षि
प्रसंग गुदरला ! डेक्कन क्वीननं पुण्य
जात होते. मागल्या युद्धाचे दिवस. स
डोकं बाहेर काढलं तों तोंडावर एक जा
रात फडफडली. कागद वाचला. लोण
वळ्याला एका युरोपियन गृहस्था
पियानो व इतर सामान विकायचं होतं.

झालं ! ह्यांचा खिसा रिकामा पण
आपले उतरले लोणावळ्याला ! गे
पत्ता काढीत ! ते गृहस्थ होते घरांत प
पत्नी नव्हती. पेशा डॉक्टरचा ! ते म्हणा
सामान माझ्या पत्नीचं आहे – उद्यां या



**बॅट आणि प्रेम**

**कोणें एकेकाळीं बॅटस् मजबूत आणि टिकावू असत आणि पुष्कळ खेळाडू वर्षानुवर्षें एकच बॅट वापरूं शकत. या दीर्घकालीन सहचर्यानें साहजिकच कांहींच्या ठिकाणीं आपल्या बॅटसंबंधीं असामान्य आप्तभाव निर्माण होई. विलियन वॉर्ड नामक एका विख्यात खेळाडूची अशी गोष्ट सांगतात कीं, त्याच्या तेहतीसाव्या वाढदिवशीं म्हणजे इ. स. १८२० त त्यानें नॉरफोक विरुद्ध एम. सी. सी. तर्फे खेळून २७८ धांवा काढल्या. ज्या बॅटनें त्यानें हा पराक्रम केला ती चार पौंड वजनाची असून वॉर्ड त्याच बॅटनें पन्नास वर्षें खेळत होता. तेव्हांच्या आणखीहि कांहीं प्रसिद्ध खेळाडूंनीं आपापल्या बॅटीचें सौख्य दीर्घकाल भोगलें होतें. जेम्स ब्रॉड ब्रिज नामक खेळाडूला अशा दीर्घकालीन सहवासानें आपल्या बॅटबद्दल एवढें प्रेम उत्पन्न झालें होतें कीं, तो फिरावयास जातांनाहि काठी ऐवजीं आपली बॅटच बरोबर नेई. जॉर्ज अन्डरसनला रात्रीं झोंप येईनाशी झाली कीं, तो आपल्या आवडत्या बॅटला जवळ घेऊन कुरवाळीत बसे ! डॅनियल डेची बॅट तर त्याच्या प्रेताबरोबरच पुरण्यांत आली आणि जॉन बॉयरची बॅट त्याच्या प्रेतपेटीलाच जाम ठोकण्यांत आली !**

**–सदानंद चेंदवणकर**









# लाइफबॉय
## ज्याचे घरीं
## आरोग्य तेथें वास करी

**प्रसन्न**! उत्साहपूर्ण! निरामय! लाइफबॉयनें स्नान केल्यानें हा आनंद आपल्याला लाभतो!
लाइफबॉयनें मळघाणींतील जंतू धुवून जातात आणि त्यामुळें कसें स्वच्छ, प्रसन्न, निरामय वाटूं लागतें!
शिवाय लाइफबॉय आतां नव्या दर्शनीय वेष्टनांत मिळूं लागला आहे. त्याची नवी वडीहि कशी सहज
हातांत राहण्याजोगी—जणूं आपल्यासाठींच खास बनविलेली! लाइफबॉय साबण आजच खरेदी करा!

L. 47-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन










अन् इतक्यांत ते डॉक्टर महाशय कविराजाच्या वोडक्या मस्तकाकडं रोखून पाहायला लागले.

"आंत या जरा" डॉक्टर म्हणाले.

ते आंत गेले.

"वसा या खुर्चीत." एका लहानग्या खोलींत डॉक्टरांनीं त्यांना वसविलं.

"तुमच्या डोक्याचे फोटो काढूं का ?"

"अवश्य ! अवश्य !" शांतपणें कविराज म्हणाले.

दोघांनाहि ह्यांत कांहीं विक्षिप्त असं वाटलंच नाहीं ! डॉक्टरानीं तीन चार प्रखर दिवे लावले. मग ते म्हणालें, "थांवा ! जरा" ! एवढं वोलून डॉक्टरानीं खणांतून झिरो नंवरची मशीन काढली.

आपल्या मस्तकावर हा असा आघात वडील असतांना होणार आहे ह्याची त्यानीं विलकुल तमा वाळगली नाहीं. शांतपणें एखाद्या कसवी नि सराईत केशकर्तनालयांतल्या कलावंताप्रमाणें त्यानीं कविराजांच्या मस्तकाचा टयूवलाईट वघतां वघतां केला. मग त्यांच्या मस्तकावरून अनेक वेळां हात फिरवून त्यांच्या डोक्यावरच्या खांचखळग्यांचं कौतुक केलं. नंतर अनेक फोटो घेतले – पुढून, मागून, तिरकस– कितीतरी !

एवढा सर्व प्रकार झाला. दोघंही शांतपणें आपापलीं कामं करीत होते. कविराजांचा पत्ता घेऊन डॉक्टरांनीं त्यांना जाण्यास अनुज्ञा दिली.

जातां जातां कविमहाराजांच्या दृष्टीस तिथला भला मोठा पियानो दिसला.

"त्याची किंमत काय ?"

"तुम्ही हें वाद्य वाजवूं शकतां का ?" डॉक्टर !

"त्याच्याशीं तुम्हांला काय करायचं आहे?"

"तेंहि खरंच ! उद्यां चारला या ! विकायचा आहे. व माझी वायको सौदा ठरवेल.

ठरल्या वेळीं ते पुन्हां तिथं गेले. डॉक्टरांनीं प्रथम डोक्याचे फोटो दाखविले व निष्कर्ष सांगितला कीं ह्या मस्तकाचा मालक एक श्रेष्ठ प्रतिमासंपन्न साहित्यिक तरी असेल किंवा साफ वेडा तरी असेल !

त्यांच्या वायकोनीं कसलीहि घासाघीस न करतां वरचसं सामान व तो पियानो त्यांना मातीमोल किंमतींत देऊन टाकला! एक दिवशीं घरासमोर एक भली मोठी लॉरी उभी राहिली असतां पियानो, एक लांबलचक कपाट वगैरे अनेक गोष्टी त्यांतून घरांत आल्या.

"हें घूड कशाला आणलंत ? तुम्हांला तर पेटीसुद्धां वाजवितां येत नाहीं !" त्यांची सौ.

"नाहीं आलं म्हणून काय झालं
एक चांगली चीज घरांत तर राहील
शिवाय एखादा मित्र म्हणाला – मल
पियानो वाजवायचा आहे तर आपल्य
घरांत असावा !"

आतां या विक्षिप्तपणाला काय म्हणावं
किती गोड नि सुरम्य आहे हा विक्षिप्तपणा
मुलांच्या मांज्याचं सुत, कुणा भविष्यकाळां
पियानो वाजविण्याची मागणी करणा
काल्पनिक मित्र, या सर्वांच्या इच्छांची
अपेक्षांची तरतूद गांठचे पैसे नासून ठेवणा
जीवात्मा विक्षिप्त असला अन् व्यवहा
नसला म्हणून लोकोत्तर नाहीं थोडाच

विक्षिप्तपणाला औदार्याची व विनोदा
सोनेरी झूल असेल तर तो जास्तच दै
नि निरंजन ! जुहूला एक पारशी गृह
रहात असत. वारा महिने अठरा काळ सका
साडे-सहा ते आठ ते नियमितपणें घोड
वरून रपेट करीत असत. आठ म्हणजे आठ
ठोक्याला त्यांचा गृहप्रवेश व्हायचाच व
सरळ घाम पुशीत जायचे न्याहारी
खोलींत. त्यांनीं आपल्या दिमतीला अक
खानसामे नि वेटर्स ठेवले होते. त्या सव
सकाळचं महत्त्वाचं काम म्हणजे आठ
मालक घरांत शिरतांच त्या अकरा नोकरां
धांवत येऊन एकेक वशी त्या गोल टेवला
ठवायची. प्रत्येक वशींत मांसाहारी पदार्थ
वेगवेगळे प्रकार असत. अकरा जणां
त्या टेवलाभवतीं सवश्या शिस्तींत व
केलंच पाहिजे ! अशा थाटांत ते वे
उभे असतांना ते. पारशी मालक यायचे
सर्व वशांकडं एक कटाक्ष टाकीत कुठल्यात
वशींतलं अक्षरशः दोनच तुकडे खायचे.
उचलल्यावरोवर त्या सर्व वेटर्सनीं पाठीम
धांव लागावा असं वशासहित पळल
पाहिजे हा दंडक ! व एवढ्यानंच भाग
नाहीं म्हणूनच कीं काय त्या वशांतलं त्यां
सर्व फस्त करून टाकलंच पाहिजे !

या पारशी दानशूर गृहस्थाला गंमत वा
यची ती म्हणजे पक्वान्न करण्याची चुर
ती अकरा जणांची धडपड, कुणाचा पद
ते खातील त्यासंबंधींचा संदेह व त्यानंतर
ती पोरकट धांवपळ – हास्य नि गडबड



## बहादूर क्रिकेटियर

जॉन स्मॉल ही व्यक्ति इंग्लंडच्या क्रिकेटच्या इतिहासांत एक अपूर्व वल्ली म्हणून ओळखली जाते. तिचा जन्म १७३७ मधें झाला. ८९ वर्षांच्या आपल्या हयातींत त्यानें अनेक विक्रम क्रीडांगणावर केले आहेत. आपल्या फुरसतीच्या वेळीं तो क्रिकेटच्या बॅटस् व चेंडू तयार करीत असे. त्यानें आपल्या दारावर आपली पाटी काव्यमय लिहिली होती ती अशी–

Here lives John Small
makes Bat and Ball
Pitch a Wicket play at cricket
With any man in England

अनेक वर्षे इंग्लंडमध्यें बॅटिंगमध्यें त्याचा नंबर पहिला होता. एकदां तर ऑल इंग्लंड विरुद्ध झालेल्या एका सामन्यांत सामन्याचे तिनही दिवस जॉन स्मॉल बाद न होतां खेळत राहिला होता ! !

–सदानंद चेंदवणकर

वस्स: येवढ्या रोजच्या गंमतीखातर एवढा प्रचंड खर्च !

वर सांगितल्याप्रमाणं औदार्य व विनोद यांचा सुंदर मिलाफ इथं आहे. कुणी म्हणतील कीं ह्यांत गोरगरिबांची क्रूर चेष्टा आहे. बिलकुल नाहीं — एक असमान्य विक्षिप्तपणा !"

सत्यपणाचा अतिरेक करून वागणूक कांटेकोर ठेवली कीं तरीसुद्धां एक बोचक विक्षिप्तपणा नकळत निर्माण होतो.

एका पुण्याच्या प्राध्यापकाचे चिरंजीव मुंबई विश्वविद्यालयाच्या बी. ए. च्या परीक्षेला बसले होते. मुंबईहून पुण्याला तार दुपारीं दोनच्या सुमारास पोंचावी अशी अपेक्षा होती. तीन वाजून गेले. तारेचा पत्ता नाहीं. मुलगा चुळबूळ करूं लागला. प्राध्यापक महाशय थंडपणें म्हणाले, "त्यांत चुळबूळ कसली करायची ? वेळ दवडूं नकोस ! पुढच्या वर्षी बैस परीक्षेला ! वेळ दवडूं नकोस ! वाचत बैस !"

नाइलाजानं मुलानं मागल्याच वर्षीचं पुस्तक वाचायला घेतलं. इतक्यांत तारवाला आलाच. अधीरतेनें मुलानं तार वाचली. त्याला फर्स्ट क्लास् मिळाला होता ! पोरगं बेहोष झालं आनंदानं ! नाचायला लागलं !

कपाळावरच्या आठ्यांचं जाळं जास्त पसरवीत प्राध्यापक म्हणाले, "हा पोरकटपणा आपल्याला शोभत नाहीं ! फर्स्ट क्लास मिळाला म्हणून काय झालं ? पुष्कळांना मिळतोच ! जा ! एम्. ए. च्या पुस्तकांची यादी घेऊन ये ! वेळ दवडूं नकोस वाचत बैस !"

आंबट चेहरा करून मुलानं यादी आणली. दोन वर्षांनीं एम्. ए. झाला. पुन्हां फर्स्ट क्लास् ! त्यानं आपल्या तिर्थरूपाला तें यश मागची आठवण लक्षांत ठेवून शांतपणेंच सांगितलं ! त्यावर चेहऱ्यावर कसलाहि फरक न करतां वडील म्हणाले "एम्. ए. झालास ? ठीक झालं ! प्रा. जोश्यांकडे जा ! पी. एच्. डीला प्रबंधाकरितां कुठचा विषय घ्यावा यांवर त्यांचा सल्ला घे. जा ! जा ! वेळ दवडूं नकोस !"

अशा विक्षिप्त व्यक्ति या ना त्या रूपानं आपल्यासमोर वावरतात.

मानवाचा विक्षिप्तपणा व त्या विक्षिप्तपणाचे कवडसे इतके वैचित्र्यपूर्ण असतात कीं त्यांवर विचार केला कीं माणूस स्तिमित होतो. तर्कशुद्ध बुद्धीला जेव्हां तडा जातो तेव्हां व त्याक्षणीं विक्षिप्तपणाचा जन्म होत असावा. एरव्ही डॉक्टर जॉन्सन्सारखा एवढा प्रकांडपंडित रस्त्यावरचे दिवे मोजता ना ! गुरुत्वाकर्षणाचा शोध लावणाऱ्या न्यूटनला, वेगवेगळ्या आकाराच्या कुत्र्यांकरितां घर स्वत: करीत असतांना त्यांच्या त्यांच्या आकाराचे वेगवेगळे दरवाजे करण्याचे फुकट श्रम पडते ना ! एका सामान्य माणसानं त्यांना सांगितलं कीं अहो न्यूटनसाहेब ! एकच मोठा दरवाजा करा कीं म्हणजे लहानमोठे सर्व त्यांतून येतील जातील ! महाराष्ट्राचे शेक्सपीअर राम गणेश गडकरी एका शेतकऱ्याचं लहान मूल कडेवर घेऊन कापडाच्या दुकानांत गेले. येतांना कापडाचं बोचकं घेऊन घरीं आले नि मूल विसरले दुकानांत ! "राजहंस माझा निजला"ची अमर देणगी देणारा हा महाभाग एका राजहंसाला मात्र नक्कीच विसरला विचार लहरींच्या तंद्रीत !

अशीं शेंकडों उदाहरणं आहेत. विक्षिप्तपणा हें मानवी जीवन समृद्ध करतं. समाजजीवनसुद्धां विक्षिप्तपणामुळं समृद्ध होतं.

नुकतेच वारलेले कोट्याधीश लॉर्ड नफिल्ड यांनीं आपल्या दारिद्र्यामुळं आपल्याला डॉक्टर होतां आलं नाहीं म्हणूनच कीं काय प्रचंड रकमा मेडिकल शिक्षणाकरितां दान केल्या ! हा एक लोकोत्तर विक्षिप्तपणाच नाहीं काय ?

जगांतले सर्व श्रेष्ठ स्त्री-पुरुष या ना त्या अर्थानं विक्षिप्त नि लहरी होते. अकबरसारखा सम्राट शिवाशिवीचा खेळ रमणीसंगे खेळत असे (आंखमिचौली) दुसरे बाजीराव लहर आल्यावर शनिवार वाड्यांतलं एक झुंबर वरून झोंकून देण्यास आज्ञा करीत व तें फुटल्याचा खळकन् आवाज आला कीं तांबुल मोठ्या खुषींत येऊन श्रीमंत चघळीत असं वाचल्याचं स्मरतं !

विक्षिप्तपणा आहे म्हणून जीवन रसरशित, आनंदमय नि जगण्यालायक झालं आहे ! विक्षिप्तपणाशिवाय जग म्हणजे एक रिफर्मेटरी शाळा झाली असती. माणसं कसली ? निर्जीव स्वार्थी यंत्रच ती ! आपल्यावर केवढे अमाप उपकार विक्षिप्तपणाचे आहेत नाहीं ?

(अन्—मी हा लेख लिहिला हा विक्षिप्तपणाचाच एक प्रकार नाहीं का ?)

● ● ●





# दुवा

-माधव अभ्यंकर

प्रगत विचाराच्या, समाजसुधारक रणधीरची पत्नी मामाला पत्र धाडून आग्रहानें बोलावते, पण 'त्या मुलाला आणूं नकोस' अशी अटही घालते. कां ? तिला मूल नव्हतं म्हणून ?

**उतरल्या** चेहऱ्यानं अनू झोपून उठली. काल मामाचं पत्र आल्यापासून तिची मुद्रा विचित्र दिसूं लागली होती. कसली तरी चिंता तिच्या काळजांत फुगत होती आणि डोक्यांत विचारांचा भोवरा गरगरत होता.

रणधीरला तिच्या वागण्याचं कोडं उलगडत नव्हतं. त्यानंहि तें पत्र वाचलं होतं. पण काळजी करण्यासारखा कोणताच मजकूर त्यांत नव्हता. अनूचा मामा सुटीचे चार दिवस घालविण्यासाठीं भाचीकडं येणार होता. नि येतांना आपल्याबरोबर एका अनाथ पाळीव पोरालाहि आणणार होता. बस्स ! या पलीकडं हवा-पाण्याच्या गोष्टीखेरीज एकहि जादा ओळ त्या टीचभर कार्डांत नव्हती.

पण तें पत्र वाचल्यापासून अनूचा उतरलेला नूर रणधीरनं पाहिला होता. आपल्या बायकोनं इतकं हवालदील कां व्हावं हें त्याला समजत नव्हतं. वास्तविक पाहतां अनू आपल्या मामाला किती वाखाणायची. समवयस्कपणामुळं मामाभाचीचं नातं विसरून ती दोघं मैत्रीनं वागत. अनू त्याला 'रघू' या एकेरी नांवानं हाकारीत असे. शिवाय एकाच घरांत त्यांचं बालपण गेलं होतं. दोघं एका शाळेंत नि कॉलेजांत शिकून लहानाची मोठी झाली होती.

रणधीरला हें सारं ठाऊक होतं. इतका स्नेह, इतकी आपुलकी असतांना रघूच्या आगमनाच्या वार्तेनं आनंदित व्हायचं सोडून अनूनं व्यथित व्हावं हें त्याला चमत्कारिक वाटत होतं.

तिला चिंता करायला मोकळी सोडून तो संध्याकाळच्या भाषणाची टाचणं तयार करत होता. त्याच्या मागं कामाची कोण गर्दी होती. एक सारखी भाषणं द्यायला धावावं लागे. पार्टीची मिटींग असली कीं कुठले ठराव मांडायचे नि कोणत्या मुद्यावर चर्चा करायची हें ठरविण्यासाठीं रात्री रात्री जागून काढाव्या लागत. खेरीज कुणाची गाऱ्हाणी, कुणाच्या अडचणी-अन्याय पार मंत्र्यांपर्यंत नेऊन भिडविण्यासाठीं सचिवालयांत खेटे घालावे लागत. अन् पार्टीच्या मुखपत्रांतील संपादकीय लिहून द्यावं लागें तें वेगळंच !

रेफरन्स बुक काढण्यासाठी रणधीरनं टेबलाचा ड्रावर ओढला आणि वरती पडलेलं अनूच्या हस्ताक्षरांतील पत्र पाहून तो चकितच झाला. त्याचा सल्ला घेतल्याखेरीज तिनं आजपर्यंत एकहि पत्र लिहिलं नव्हतं. नि आजच कुठलं वेड तिच्या डोक्यांत शिरलं होतं कोण जाणे. विभक्त झाल्यागत, निराळी चूल मांडल्या-गत ती तुटकपणें वागत होती.

रणधीरनं भिरभिरत्या नजरेनं पत्र वाचलं आणि त्याला अनूच्या स्वभावाचं नवल वाटू लागलं. मामाला तिनं आवर्जून प्रेमाचं आमंत्रण धाडलं होतं. पण मुलाला बरोबर आणूं नको, एकटाच ये असं बजावून लिहिलं होतं.

रणधीरच्या कपाळावर एक सूक्ष्म आठी उमटली. डोळ्या-वर घसरलेली कुरळ्या केसांची बट कुस्करत नि एका हातांत



अनुक्रमणिका

पत्र फडफडावीत तो माडीवरून खालीं आला. अनू श्रीकृष्णाच्या तसविरीवर गंधाचा टिळा लावत होती. तिच्या पुढं पत्र नाचवीत तो किंचित् रोषानं म्हणाला,

" हें काय अनू ? वेडयासारखं—"

पण त्याचं म्हणणं पुरतं न ऐकून घेतां ती एकदम मागं सरकली आणि भुवया उंचावून म्हणाली,

" इश्श, शिवाल कीं ! मी सोवळयांत आहे. पूजा करतेंय् हें दिसतंय् ना ? अन् तरीहि . . . . . "

रणधीरनं विचित्र नजरेनं अनूकडं पाहिलं. एखाद्या पिळवट-लेल्या दोऱ्याचा गुंता उकलावा तसा अनूच्या गूढ वागण्याचा संदर्भ त्याच्या लक्षांत येऊं लागला.

इतका वेळ त्याला वाटत होतं कीं लग्नाला पांच वर्षं झालीं तरी कूस उजली नाहीं; कदाचित् याच शल्यापोटी अनूची वात्सल्याची भावना आटली असेल. पण आतां त्याच्या मनांत वेगळाच तर्क जागला नि तो एकदम दचकला . . . . . अनूच बोलते आहे हें ? समाजसेवेचं कंकण बांधलेल्या निरक्षेप पुढाऱ्याच्या पत्नीनं मनांत असले संकुचित विचार घोळावावेत ?

अस्वस्थ हालचाल करून पत्राची घडी घालत तो उद्‌वेगानं म्हणाला,

" अनू, उगाच वेडयासारखी काय वागतेस ? त्या पोराचा काय दोष ? कां म्हणून त्याचा दुस्वास ?"

एकदम उसळून ती म्हणाली.

"तुम्हांला नाहीं कळायचं ! ज्याच्या आईबापाचा पत्ता नाहीं असं कुठलं अनाथ अर्भक रघूनं सहा वर्षापूर्वी उचलून आणलं आणि त्याला वाढवत बसालाय बाप असल्याप्रमाणं ! पण मला नाहीं खपायचा असला भ्रष्टाकार !"

रणधीर एकदम चरकला. आपल्या बायकोनं संकुचित, सडलेल्या विचारसरणींत गुरफटून जावं याचा त्याला राग आला. अनाथ—अपंगांचा, दीन दलितांचा कैवार घेणाऱ्या त्या निरक्षेप पुढाऱ्यानं वैतागावं असंच अनू वागत होती. तो जातपातीच्या भावना विसरला होता. देश आणि मानवता यांसाठी जिवाचं रान करीत होता. आणि अनू मात्र मध्ययुगांतल्या मूर्ख स्त्रीप्रमाणं वेडगळ विचारांचे देव्हारे माजवत होती.

हातावर हात घासत, विषादपूर्ण स्वरांत तो म्हणाला,

" अनू, डोन्ट बी सिली ! ज्या स्थितींत तें अर्भक पडलं होतं, त्यांत त्याचा काय दोष ? नीट विचार कर ! साराच मूर्खपणा करते आहेस तूं—"

त्याच्या बोलण्याकडं लक्ष नसल्याप्रमाणं ती मख्ख बसून होती. रणधीर मग कांहींच बोलला नाहीं. पार्टीच्या सेक्रेटरीला भेटण्यासाठी तो निघून गेला. आणि अनू भोवळ आल्यासारखी स्वयंपाकघरांत भिरभिरत राहिली.

चार चार वेळां तिनं तें पत्र वाचलं. त्याची घडी केली, पुन्हा उलगडली, पुन्हा वाचली. काळजांत कांटा बोचल्याप्रमाणं तिचा चेहरा झाला.

तिला वाटलं, साराच मूर्खपणा चालविला आहे आपण. उगाच भलत्या थराला साधी बाब नेत आहोंत. रघू आला—अगदीं त्या मुलाला घेऊन आला; तरी काय विघडणार आहे ? रणधीर म्हणाला तेंच खरं. अगदी आचरटासारख्या वागतों आहोत आपण, त्यापेक्षां हें पत्र फाडून टाकावं. नि दुसरं लिहावं. रघूला आग्रहानं बोलवावं अगदीं मुलाला घेऊन !

पण मग तिचे ओठ थरथरले. फाडायला घेतलेलं पत्र तसंच राहिलं. नि पाकिटांत त्याची घडी ठेवत तिनं पत्तासुद्धां लिहिला.

शेजारची कुमुद शाळेला चालली होती. तिला हांक मारून तिच्याकडं पत्र द्यावं असा अनूनं बेत केला. पण कसल्याशा अनामिक शंकेनं तिनं माघार घेतली . . . . .ती पोरटी वहींत नाहींतर पुस्तकांत पत्र ठेवायची नि पेटींत टाकायचं तसंच राहून जायचं आणि ध्यानींमनीं नसतांना मुलासकट रघू हजर व्हायचा !

अनू उठली. आरशापुढं उभं राहून तिनं केस नीटनेटके केले आणि सँडल्स चढवून, दाराला कुलूप ठोकून ती बाहेर पडली. वरून उन्हाचा सणका बसत होता. तापलेल्या हवेच्या झळा अंगाला बोचकारत होत्या. विचित्र मरगळ आलेला रस्ता स्तब्ध झाला होता. पण अनू आवेशानं भराभरा चालली होती. पंधरा मिनिटांच्या पायपिटी नंतर ती पोस्टांत आली आणि तांबडया फटींत पत्र सारून माघारी वळली. आतां तिचं मन निर्धास्त झालं होतं.

रस्त्यांतून रणधीर कुणा पांचसहा दलितांचं गाऱ्हाणं ऐकत चालला होता. पार्टीच्या मोटारगाडया दिमतीला असतांना त्यागी वीराच्या आवेशांत तो उगाचच अनवाणी भटकत होता. अनूला क्षणभर त्याचा राग आला. नि मग एकदम कींव आली. दिवसा ही अशी पायपीट करायची आणि डोळे तळावले म्हणून रात्री दुधाच्या घडया घालायच्या. हक्काचं ऐश्वर्य मिळत असतांना विनाकारण त्यागाचा जोगवा वागवायचा. यानं चंदनासारखं झिजा-यचं नि आयते टिळे मात्र दुसऱ्यांनी मिरवायचे. या ठकवाठकवीच्या दुनियेंत त्यागाला कवटाळून काय मिळणार आहे ? तिला वाटलं,








त्याला विचारावं कीं उन्हाचा असा वैराग्यागत कां वणवणतोस ?

पण दलितांना निरोप देऊन तो पार्टीच्या इमारतींत घुसलेला तिनं पाहिला नि सुन्न मनानं ती घरीं परतली.

रणधीर पार्टीच्या कामासाठी बाहेर पडला म्हणजे रात्रीशिवाय घरीं येत नसे. त्यामुळं त्याची वाट पहात बसण्यांत अर्थ नव्हता. अनूनं ताट वाढून घेतलं. चांदीचं फुलपात्र पाण्यानं भरून ठेवलं आणि ती भात कालवूं लागली. पण तिला अन्नाचा वास नको झाला. आतड्यांत कुठंतरी टोचणी लागली. सगळ्या गोष्टींचा वैताग आल्यागत, वीट आल्यागत वाटूं लागलं. पुढ्यांतलं अन्न, श्रीकृष्णाची तसबीर, भकाभका जळणारी समई नि धूर ओकणाऱ्या उदवत्त्या . . . . . सगळं नकोसं झालं.

ती मग तशीच उठली आणि हात आंचवून सोप्यांत आली. बंद पडलेल्या घड्याळाला किल्ली देऊन तिनं वेळ जुळविली. टेबलखुर्च्या पुसून काढल्या. आणि रणवीरच्या भाषणाचा नुकताच प्रसिद्ध झालेला संग्रह काढून वाचायला घेतला. पण तिचं मन रमेना. उदास उदास वाटूं लागलं. म्हणून मग ती रेडिओच्या बटणाशीं खेळूं लागली—एखाद्या लहान मुलाशीं खेळल्यागत ! लहान मुलाशीं . . . . .

ती एकदम दचकली. रघू आणि तो मुलगा आपल्या पुढ्यांत उभा असलेला पाहून ! तिनं डोळे मिटले, उघडले, चोळले. ती भानावर आली. तो रघू नव्हता. पण त्याच्याच वयाचा कुणी तरुण चार वर्षांच्या मुलाला घेऊन आला होता.

" कोण हवं ?" तिनं चमकून विचारलं.

" साहेब . . . . रणवीरसाहेब . . . . " तो अडखळत म्हणाला, " पार्टीच्या वार्षिक मिटींगमध्यें मांडण्यासाठीं कांहीं सूचना . . . ." तो वरंच कांहीं बोलला. पण अनूचं लक्षच नव्हतं. ती अगदी निवांत बसली होती. त्याचं बोलणं संपल्यावर म्हणाली,

"पार्टीच्या कार्यालयांत गेलेत ते ! तिथंच भेटा त्यांना. नाहींतर उद्यां सकाळीं या !"



लहान पोराचं बोट पकडून तो निघून गेला. मुलाच्या परत जाणाऱ्या चिमुकल्या पावलांकडं ती अनिमिष नेत्रांनीं पहात होती. एकाएकी तिच्या काळजांत पोकळी निर्माण झाली. आणि खूप कांहींतरी हरवल्यासारखी चुटपूट तिला छळूं लागली.

दुपारीं महिलामंडळांत जायचं तिनं टाळलं नि संध्याकाळीं फिरायला जायचं सोडून ती अंधारांत बसून राहिली.

रात्रीं रणवीर आला. पाटावर बसून पातांतलं अन्न मुकाटपणें चिवडूं लागला. अनूला वाटलं, त्यानं बोलावं, नेहमीप्रमाणं विनोद करावा, हंसावं, हंसवावं, स्वतःबरोबर जेवण करायचा आग्रह धरावा . . . . . पण आज तो उद्विग्न दिसत होता. तिच्याकडं विचित्र नजरेनं पहात होता. ती भीषण शांतता . . . . . त्याची विक्षिप्त नजर . . . . . अनूला भीति वाटली. भाताचा घास अर्धांतरी धरत तो म्हणाला,

" अखेर तूं आपल्या मनाप्रमाणं केलंस ?"

" काय ?" समजून उमजून तिनं प्रश्न विचारला. तिचा ऊर धडधडत होता.

" सकाळीं लिहिलेलं पत्र . . . . . " तो एकदम गप्प झाला.

"पोस्टांत टाकलं . . . . . " ती तुटकपणें म्हणाली आणि गुडघ्यांत मान घालून स्वस्थ राहिली.

रणवीरचा चेहरा आकसला. ओठ दातांखालीं दाबला गेला. नाकपुड्या रागानं फुलल्या. पाण्याचं भांडं ताटांत लवंडून तो ओरडला

" तूं . . . तूं . . . वांझोटी आहेस म्हणून असले सडके विचार येतात तुझ्या मनांत. पण ध्यानांत ठेव, कुणाचा दुस्वास करून दुवा नाहीं मिळायचा. अशीच वांझोटी राहशील जन्मभर—" पायानं ताट ठोकरून तो माडीवर निघून गेला. अनूचे डोळे भरून आले नि हुंदका फुटला.

रात्रभर ती अश्रू ढाळत होती. पोटांत खड्डा पडत होता.

अनूवर संतापलेला, स्वतःशीं चिडलेला रणधीर टेबलाशीं बसून कागदांचा ढीग उस्कटत होता; टाचणं बनवत होता. मधूनच अस्वस्थपणें डोकं दाबून धरत होता. . . . .

चार दिवस अगदी तलवारीच्या धारेवर कसरत केल्याप्रमाणं गेले. अनू ढासळल्यागत झाली होती. रणधीर उपहासानं, धिःकारानं तिच्याकडं पहात होता. त्याच्या त्या विचित्र बघण्याचं तिला भय वाटत होतं.

अखेर रघू आला आणि साऱ्या प्रकरणावर पडदा पडला. तो एकटाच आला होता. त्याच्या खांद्यावर हात ठेवत रणधीर म्हणाला,

" रघुनाथ, आय् ॲम् एक्स्ट्रिमली सॉरी . . . अनूनं असं पत्र लिहायला नको होतं. त्या पोराचा दुस्वास . . . एका अनाथाचा . . . दलिताचा . . . . . इट इज व्हेरी पेनफुल फॉर मी . . . "

दिलगिरीनं हंसत रघुनाथ म्हणाला,

" मला कळतीय् तुमची व्यथा. व्यापक दृष्टीकोन बाळगणाऱ्या पुढाऱ्याच्या पत्नीनं असं वागायला नको. पण तुम्ही मनाला लावून घेऊं नका. मी समजावीन तिला—"









रणवीर मनांतली सगळी मळमळ विसरला. स्वयंपाक-घरांत खुडपुडणाऱ्या अनूला हांक मारूं लागला. ती बाहेर आली आणि रघूला एकट्याला पहातांच सुटकेचा निश्वास टाकून म्हणाली,

" अय्या, रघू ? अन् केव्हां आलास रे ? निदान आधी कळवायचं तरी. स्टेशनवर आलें असतें–"

त्यानं हंसून तिच्या डोक्यावर टपली मारली आणि दटा-वल्यागत तो म्हणाला,

" फार स्टेशनवर येणारी लागून गेलीय् ! ऐन वेळीं नव-ऱ्याला पिटाळलं असतंस मामाच्या स्वागताला—"

ती लहान मुलागत फुरंगटली.

" जा, येवढा तोरा आहे तर कुणात्रं अडलंय् ?" तिनं रागानं गाल फुगविले.

" बरं बुवा, राह्यलं . . . . पण इतकं रागवायला हवंच का—"

त्याच्या या बगलमारू बोलण्यानं ती अधिकच चिडली. नि घुसमुसत म्हणाली,

" अगोदर चुकायचं नि मग सारवासारवी करायची ! नेहमीचंच आहे तुझं हें—"

रघुनाथ हंसला नि रणधीरकडं पहात मिस्किल सुरांत म्हणाला,

" लहानपणापासून हें असंच बरं का. वांग्याचं भूत नुसतं. फट् म्हटलं कीं झालीच ब्रह्महत्या ! रूसायचं काय, फुगायचं काय .... एक तऱ्हा धड नाहीं. . . . . व्यवहाराच्या नांवानं तर नुसता भोपळा . . . "

रणधीर सिगरेटची राख झटकत म्हणाला,

" तें पाहतोंच आहे मी रोज. आतांचंच बघाना. . . . भांडायला वेळ आहे हिला. पण चहा करायला, पाहुण्याचं आतिथ्य करायला सवडच नाहीं . . . "

या बोलण्यावर अनू आंत पळाली. रघुनाथ मग रणधीरकडं मोहरा फिरवून म्हणाला,

" काय पुढारी, काय म्हणते तुमची पार्टी नि राजकारण ?"

रघुनाथानं आस्थेनं चौकशी केल्यावर रणधीरला हुरूप चढला. नि तो सारखा बोलतच राहिला. पार्टीचं कार्य, तत्त्वं, कार्य-कारिणींतले पदाधिकारी, सरकारी पक्षाचं धोरण . . . अनेक विषयांवर त्यानं आपले विचार बोलून दाखविले. रघुनाथनं त्याला प्रश्न विचारले, शंका उपस्थित केल्या नि दोन तीन मुद्यावर अडवणूक सुद्धा केली. पण राजकारणाच्या आखाड्यांत कसलेल्या रणधीरनं त्याला आपलीं मतं पटवून दिलीं. त्याच्या प्रश्नांना समर्पक उत्तरं दिलीं, शंकांचं निरसन केलं आणि अडवणुकीचे मुद्देसुद्धा उलटे त्याच्याच गळ्यांत बांधले.

अनू चहाचा ट्रे घेऊन आली तेव्हां राजकारण संपलं नि घरगुती गप्पा सुरू झाल्या. तासभरानि गप्पा मारल्यावर रणधीर एकदम उठला आणि आठवण झाल्यागत म्हणाला,

" अरे, साफ विसरलोंच होतों कीं मी ! आज पक्षाच्या कार्यकारिणीची बैठक आहे . . . रात्रीपर्यंत घनचक्कर चालेल . . . "

रणधीर निघून गेला. अनला रुखरुख लागल्यागत झालं. काळजाला सल लागला.

पण वर वर तिनं ओढून ताणून चंद्रबळ आणलं. चेहरा शक्य तितका निर्विकार ठेवला आणि हंसत खेळत, गप्पागोष्टी करत रघूबरोबर जेवण उरकलं.

रघू मग हात आंचवून माडीवर गेला. अनूहि त्याच्या मागोमाग वर गेली. पानाचं तस्त पुढ्यांत ओढून रघू विडा बनवूं लागला. तेव्हां त्याला अडवून अनू म्हणाली,

" तूं कशाला करतोस ? मी देतें बनवून–"

अनूनं चार कोवळीं पानं निवडलीं. त्यांची देठं आणि शिरा काढल्या. प्रमाणांत चुना, कात, सुपारी भरून गोविंद विडा बनवला आणि तो रघूला देण्यासाठीं हात पुढं केला. त्याबरोबर तिचं मनगट धरून रघून विचारलं,

" संजयला आणूं नको म्हणून कां लिहिलंस ?"

रघुनाथाच्या हातांत मनगट विसावूं देत तिनं सुस्कारा टाकला. तिची नजर दुखावली होती. चेहऱ्यावर अंतःकरणांतल्या जखमेचा डाग उमटला होता.

मान खालीं घालून तिनं दातांखालीं ओठ दाबला.

रघुनाथाला रहावलं नाहीं. तिचा खांदा घुसळत तो मृदु स्वरांत म्हणाला,

" रमेश विमान अपघातांत गेला ! पण म्हणून का संजयला टाळतेस ? त्याला पहावसं वाटत नाहीं तुला ? आपल्या मुलाला . . . रमेशच्या नि तुझ्या प्रेमाचा अंकूर . . . लग्नापूर्वी झालेला . . . . "

अनूला एकदम जोराचा हुंदका आला. स्वतःला कष्टपूर्वक सावरून ती थरथरत्या आवाजांत म्हणाली,

" वाटतं रे . . . फार फार वाटतं . . . आंतड्याला पीळ पडतो, मन सारखी ओढ घेतं . . . आणि म्हणूनच मी टाळतें . . दूर राहते . . . तो समोर आला तर वेड लागेल मला . . . "

हुंदके देत तिनं मान फिरवली आणि आढ्याकडं पहात रघुनाथ स्तब्ध राहिला.

• • •



# क्रिकेटमधील प्रसिद्ध घराणी

—बाळ ज. पंडित

**संगीतांत** जशी गवय्यांची घराणी असतात तशी क्रिकेटमध्येंही कांहीं 'घराणी' प्रसिद्ध आहेत ! एका विशिष्ट कुळांत जन्माला आलेल्या लक्षाधीशाचा मुलगाही लक्षाधीक्ष होईल असें सांगता येत नाहीं. पण तो जर लक्षाधीश किंवा कोटयाधीश झाला तर ती एक आश्चर्याची गोष्ट ठरतें. कारण वडिलांची परंपरा प्रत्येक क्षेत्रांत चालविली जातेच असे नाहीं. मुख्य मंत्र्याचा मुलगा पुढे मुख्य मंत्रीच व्हावा, किंवा नटाचा मुलगा नटच निघावा यांत कर्मधर्म संयोगाचा बराच भाग येतो. मात्र कांहीं बाबतींत गुणही वंशपरंपरागत असतात. चांगल्या तबलजीचा मुलगाही तितकाच चांगला तबलजी झालेला दिसतो. उत्कृष्ट गवय्याचा मुलगाही उत्तम गवई ठरतो. लेखकाचा मुलगाही लेखक बनतो. आणि त्याचप्रमाणें क्रिकेटवीराचा चिरंजीव देखील क्रिकेटवीरच होतो. पण हे क्वचित् किंचित् घडते. त्यामुळेंच कदाचित् अशा कांहीं मोजक्या वेचक उदाहरणांत अद्भूतता वाटेल. क्रिकेटमध्येंही कांहीं योगायोगानें तर कांही प्रयत्नपूर्वक 'घराणी' झालेली आहेत आणि ती प्रसिद्ध आहेत.

माझ्या माहितीची पुण्यांत किमान चार तरी कुटुंवें आहेत की ज्यातले कर्ते लोक हे त्यांच्या उमेदीच्या वर्षांत उत्कृष्ट क्रिकेटर होते. उदाहरणार्थ अनपट कुटुंबच घ्या ना. या कुटुंबांतले तीघेही भाऊ क्रिकेटर्स. त्यातल्या त्यात गंमत म्हणजे त्यापैकी दोघे यष्टीरक्षक. यापैंकी प्रत्येकजण कॉलेजच्या संघातून इंटर कॉलेजीएट स्पर्धांतून खेळले. गुप्ते कुटुंबही तसेच. शंकरराव गुप्ते, बंडु गुप्ते, आणि. चितु गुप्ते. तीघेही भाऊ रणजी ट्रॉफीच्या लायकीचे. यातही परंत वैंशिष्टय म्हणजे एका गुप्त्यांचा मुलगा इंटर युनिव्हर्सिटीपयंत पोचला. हा चवथ्या भावाचा मुलगा. हें लक्षांत घेतले म्हणजे मग विशेषच मौज वाटते. आणि शिवाय शंकरराव गुप्ते यांचा मधु गुप्ते तर सध्या महाराष्ट्राचा एक उदयोन्मुख खेळाडू ठरलेला आहे. त्याचा धाकटा भाऊही शालेय संघातून व मग कॉलेजच्या संघांतून खेळला. या खेरीज हसबनीस मंडळीही अशीच क्रिकेटमहशूर. चौघा भावांपैकी तीघेजण क्रिकेट खेळणारे. पैकी दोघे अनपट प्रमाणेंच यष्टीरक्षक. यापैकी वसंत हसबनीस तर रणजी ट्रॉफी खेळाडूच ठरला. बापु नाडकर्णीचे भाऊही क्रीडापटु आहेत. आणि प्रा. देवधरांचे उदाहरण तर सुप्रसिद्धच आहे. त्यांचा मुलगा सध्या असेरिकेंत आहे म्हणून. तो हिन्दुस्थानांत राहिला असता तर मला वाटतें त्याने प्रा. देवधरांचे भारतीय संघाच्या नेतृत्वपदाचे अधुरे स्वप्न खासच साकार केलें असतें. मधल्या पातळीवरची ही उदाहरणें झाली. यापेक्षा वरच्या पातळीवरही अशी उदाहरणें सांपडतात. पण ती दुर्मिळ. टेस्ट सामन्यांत जेव्हा भाऊ भाऊ खेळतात किंवा पूर्वी गाजून गेलेल्य खेळाडूचा मुलगा आतां खेळू लागतो तेव्हां रसिकाला आनंद वाटत आणि त्या क्रिकेट-कुटुंबाबद्दल अभिमानही वाटूं लागतो.

१८८० सालीं ओव्हल मैदानावर जो इंग्लंड विरुद्ध ऑस्ट्रेलिय यांच्यातला टेस्ट सामना झाला त्यांत ग्रेस याच नांवाचे तीन खेळा होते. एकाचे नांव डॉ. डब्ल्यू. जी. ग्रेस, दुसऱ्याचे डॉ. ई. एम्. ग्रेस व तिसऱ्याचे जी. एफ्. ग्रेस. आणि हे तीघेही सख्खे भाऊ भाऊ ! अशा रीतीने क्रिकेट इतिहासांतील 'ग्रेस फॅमिली' ही पहिली असाव की ज्यांतले तब्बल तीन बंधु इंग्लंड संघासाठीं राबले, देशासाठ खेळले ! त्यांच्या आई वडिलांना कोण धन्यता वाटली असणार ?

दुसरे असें कुटुंब म्हणजे–हर्नचे. १८९१–९२ च्या मोसमांत के टाऊनला एक टेस्ट सामना चालू होता–इंग्लंड व दक्षिण आफ्रिक यांच्या संघात. त्या वेळीं दक्षिण आफ्रिकेकडून खेळले ए. हर्न आणि जी. जी. हर्न हे बंधुद्वय आणि मौज अशी की त्यांचा तिसरा भा फँक हा त्याच सामन्यांत खेळत होता इंग्लंड संघाकडून. एकाच वेळ दोन वेगवेगळया देशाकडून खेळणारे हे बंधुत्रय अद्वितीय असावेत.

टेस्ट सामन्यांना सुरुवात झाल्यामुळें व त्या सामन्यांना मिळणाऱ्य प्रसिद्धीमुळें वरील दोन कुटुंबें खूप प्रकाशांत आली हे खरे. प तत्पूर्वी १७४४ सालीं, १८ जूनला इंग्लंडमधील आर्टलरी मैदानाव एक सामना झाला होता व त्यांत इंग्लंडकडून केंट विरुद्ध न्यू लँ कुटुंबांतले तीन बंधुराज प्रथमच एकत्र खेळले होते !



अनुक्रमणिका

मद्रासच्या त्या टेस्टमध्यें तर एक फारच दुर्मिळ योग घडून आला. त्यांत बंधुद्वयांच्या दोन जोडया एकाच वेळीं खेळल्या. वझीर व नझीर यांच्या बरोबरीनें सी. के. व सी. एस्. ही भारतांतील प्यारी नावं वाचावयास मिळाली. नायडु बंधु हे एकूण चार टेस्टमध्यें एकत्र खेळले. म्हणजे अलिबंधुवर त्यांनीं एक प्रकारें मातच केली.

हनिफ व मुश्ताक महंमद हे दोघे पुष्कळ वेळां एकत्र खेळलेत. पण यांत नवल असे कीं त्यांचा तिसरा भाऊ वझीर हाहि टेस्ट प्लेयरच होता. मात्र तीघेही एकत्र असे कधींच खेळले नाहींत !

हीं भारत व पाकचीं ठळक उदाहरणें.

इंग्लंडचे पीटर रिचर्डसन व डेरेक रिचर्डसन हे दोघे भाऊ भाऊ १९५७ सालीं वेस्ट इंडिज विरुद्ध नॉटिंगहॅमच्या टेस्टमध्यें खेळले.

ऑस्ट्रेलियाचे ए. सी. बॅनरमन व सी. बॅनरमन हे दोघे १८७९ सालीं मेलबोर्नच्या टेस्टमध्यें इंग्लंडविरुद्ध खेळले होते. त्यांचे डी. डब्ल्यू. ग्रेगरी व ई. जे. ग्रेगरी हे दोघे १८७७ साली इंग्लंड विरुद्ध खेळले.

ऑस्ट्रेलियाची आणखी एक गाजलेली बंधुद्वयांची जोडी म्हणजे जी. गिफन व डब्ल्यू. एफ्. गिफन यांची. दोघेही ऑस्ट्रेलिया संघाकडून इंग्लंडविरुद्ध खेळले १८९२ सालीं अॅंग्लेड मैदानावर.

वेस्ट इंडिजची अशीच चमकलेली जोडी जी. सी. ग्रँट व आर. एस्. ग्रँट यांची. दोघंही १९३४–३५ सालीं इंग्लंडविरुद्ध खेळले. विशेष असे की ते दोघे ओळीनें चारीच्या चारी टेस्टमध्यें निवडले गेले होते. वे. इंडिजचा लोकप्रिय खेळाडु जेफ्. स्टोलमेयर हा भारतांत आलेला होता. तो व त्याचा भाऊ 'व्ही. एच्.' हे दोघे १९३९ सालीं एकत्र खेळले होते.

दक्षिण आफ्रिकेनें तरी काय घोडे मारलेत ? सर्व देशांत किमान एक दोन तरी अशी परंपरा टिकवणारी उदाहरणे घडली, मग दक्षिण आफ्रिकन क्रिकेट इतिहासही त्याला अपवाद कसा ठरेल ? त्यांचेकडेही अॅथॉल रोवन व एरीक रोवन हे तब्बल ९ वेळां एकत्र खेळलेले आहेत ! आहे ठाऊक ? ४८ सालीं इंग्लंड विरुद्ध पांचापैकी चार टेस्टमध्यें व नंतर ५१ सालीं इंग्लंडच्या दौऱ्यांत ओळीनें पांचही टेस्टमध्ये ते एकत्र खेळले !

इंग्लंडकडून स्टड बंधु (सी. टी. व जी. बी.) हे चार टेस्ट्समध्यें एकत्र खेळले. तर ऑस्ट्रेलियाकडून ट्रॉट बंधु (ए. ई. व जी. एच्.) हे तीन टेस्टमध्यें एकत्र खेळले.

नजीकच्या भूतकाळांतले बंधुराज एकत्र टेस्ट खेळण्याचें उदाहरण भारतांतलेच आहे. १९६१ सालीं मुंबईला झालेल्या कसोटी सामन्यांत कृपालसिंग व मिल्खासिंग हे दोघ इंग्लंडविरुद्ध खेळले हे कित्येकांनीं प्रत्यक्ष पाहिलेच असेल.

हीं झाली दोन भावांची एकाच टेस्टमध्यें खेळण्याचीं उदाहरणें. कित्येक वेळां असे होतें कीं अशी सुसंधी प्रत्येकाच्याच वांट्याला येत नाहीं. त्यामुळें एक भाऊ अगोदर टेस्ट वीर ठरतो तर त्याचा धाकटा भाऊ कालांतराने टेस्टच्या क्रेस्टचा धनि ठरतो. उदाहरणार्थ :–**भारताचे** आपटे बंधु (माधव व अरविंद) व गुप्ते बंधु (सुभाष व बाळु) विजय व त्याचा भाऊ उदय मर्चंट हे दोघे टेस्ट खेळले. पण एक खेळला अधिकृत व दुसरा अनधिकृत. **इंग्लंडचे** गन् बंधु (जे. आणि डब्ल्यू.) आणि टिल्डस्ले बंधु (जे. टी. व ई.) तसेंच गिलीगन बंधु. **ऑस्ट्रेलियाचे** केन आर्चर व रॉन आर्चर हे दोघे बंधु. त्याचप्रमाणें नील हार्वे व एम्. हार्वे हे दोघे बंधु. त्यांचेच मॅक्लीऑड या कुटुंबातले सी. ई. व आर. डब्ल्यू. हे दोघे भाऊ. आणि ट्रंबल बंधुसुद्धा. **वेस्ट इंडिजतर्फे**– रॉबर्ट ख्रिस्तीयानी व सी. एम्. ख्रिस्तीयानी हे दोघे बंधु. तसेंच रॉय मार्शल व एन. मार्शल हे दोघे. **दक्षिण आफ्रिकेकडून** ए. बी. टँकेड, एल्. जे. टँकेड, व व्ही. एम्. टँकेड हे तीघे वेगवेगळ्या वेळीं स्वदेशाकडून खेळलेले आहेत.

याहून गंमतीची गोष्ट म्हणजे दोन जुळे भाऊ एकाच संघाकडून खेळतात तेव्हां घडून येते. यात अलेक बेडसर व एरीक बेडसरचे उदाहरण सर्वश्रुतच आहे. त्याचप्रमाणें नॉर्थअॅम्प्टनशायरकडून जे. एस्. व डब्ल्यू. एच्. डेंटन हे दोघे जुळे भाऊ खेळलेले आहेत. दक्षिण ऑस्ट्रेलियाकडून हिल कुटुंबांतले दोन जुळे भाऊ खेळले आहेत. त्याचप्रमाणे सॉमरसेटकडून खेळणारे रीपन जुळे बंधु व वॉरीकशायरकडून खेळणारे स्टीफन्स जुळे बंधुही कांहीं कमी प्रसिद्ध नव्हते.

१९७४ मध्यें ग्लॉस्टरशायरकडून खेळतांना डब्ल्यू. जी. ग्रेस व त्याचा भाऊ जी. एफ्. ग्रेस या दोघांनी यॉर्कशायरच्या वीसपैकी तब्बल १७ विकेटस् घेऊन दाखवल्या. 'डब्ल्यू. जी.' ने विकेटस घेतल्या एकूण ११ व त्याच्या भावाने घेतल्या ६ ! त्याच सामन्यांत 'डब्ल्यू. जी.'ने धावा केल्या १६७ व त्याच्या भावाने केल्या ३० ! ग्रेस बंधुंनी गाजवलेला सामना असेच त्या सामन्याचें वर्णन केले पाहिजे नाहीं का ?

१८९९ सालीं तर फॉस्टरबंधु एकाच सामन्यांत एकत्र तर खेळलेच पण त्या दोघांनीहीं बहाद्दूरीचा पराक्रम केला. हॅमशायर विरुद्ध खेळतांना दोघांनीहीं दोन्ही डावांत वैयक्तिक शतकें काढली. आर. ई. फॉस्टरने केल्या १३४ व नाबाद १०१ धावा आणि डब्ल्यू. एल्. फॉस्टरने केल्या १४० व नाबाद १७२. अशीच कामगिरी क्लेम हिल व त्याचा भाऊ एल्. आर. हिल या दोघांनी केली. दोघंही दक्षिण ऑस्ट्रेलियाकडून न्यू साऊथ वेल्सविरुद्ध खेळत होते. त्या सामन्यांत क्लेम हिलने केल्या १५६ धावा व त्याच्या बंधुराजाने केल्या १२३ धावा.

अशी कर्तबगारी बजावणाऱ्या बंधुद्वयांना आनंद आणि त्यांचा पराक्रम पहाणाऱ्यांनाही आनंद वाटत नसेल कां ?

ही झाली भावाभावांचीं उदाहरणें.

क्रिकेटमध्यें पितापुत्रांचीही कांहीं उदाहरणे आहेत. पित्याने टेस्ट खेळायची आणि त्याचेच रक्त ज्याच्या नसानसांत वाहत आहे अशा त्याच्या चिरंजीवानेही कालांतराने स्वदेशाकडून टेस्ट खेळायची ही घटनाही स्फूर्तिदायकच म्हटली पाहिजे.

**इंग्लंड**—हार्ड स्टाफ पितापुत्र. मान् पितापुत्र. (एफ्. जी. व एफ्. टी.) विशेष असे की हे दोघेही मान् इंग्लंड संघाचे वेगवेगळ्या वेळीं कप्तान होते. केव्हढा हा 'बहुमान'! जीम् पार्क्स (म्हणजे इंग्लंडचा सध्यांचा यष्टीरक्षक.) त्याचे वडिलही पूर्वी इंग्लंडकडून टेस्ट खेळलेले आहेत. मॉरीस टेट व त्याचे वडील एफ्. डब्ल्यू. टेट. तसेंच टाऊनसेंड पितापुत्रही इंग्लंडकडून टेस्ट खेळलेले आहेत.

**ऑस्ट्रेलिया** :—इ. जे. ग्रेगरी व एस्. ई. ग्रेगरी हे पितापुत्र.

**दक्षिण आफ्रिका** :—हर्न (एफ्. व जी. ए.) यांपैकी एफ्. हर्न हा इंग्लंड संघातर्फेही खेळला आहे. नोर्स पितापुत्रांचे उदाहरण तर जगप्रसिद्धच आहे. त्याशिवाय एल्. व एल्. आर. टकेट हे दोघे पितापुत्र दक्षिण आफ्रिकेकडून टेस्टमध्यें खेळलेले आहेत.

मात्र वेस्ट इंडिज व न्यू झीलंडकडे अशी उदाहरणे अजून घडलेली नाहींत.

**भारत व पाकिस्तान** :—एस्. वझीरअली भारताकडून खेळला व त्याचा मुलगा खलिद वझीर हा पाककडून खेळला ! नबाब ऑफ पतौडी—थोरले व धाकटे—या दोघांना भारताचे नेतृत्व करण्याचा मान मिळाला ! थोरले नबाब तर भारत व इंग्लंड अशा दोन देशांकडून खेळले आणि धाकटे हे जगांतले सर्वात लहान वयाचे कप्तान ठरले.

वरील पितापुत्र वेगवेगळ्या कालखंडात खेळले व तळपले. परंतु डब्ल्यू. बेस्टवीक व त्यांचा मुलगा आर. बेस्टवीक हे दोघे १९२२ सालीं डर्बीशायरकडून एकाच वेळीं खेळले. १८९१ सालीं नॉटींगहॅमकडून डॅफ्ट पितापुत्र असेच एकत्र खेळले होते. गन् पितापुत्र तर कित्येक सामन्यांतून एकत्र खेळले. एका सामन्यांत तर वडिलांनीं १८३ धावा केल्या तर त्याच सामन्यांत चिरंजीवानेही नाबाद १०० धावा काढून दाखवल्या. (१९३१) वॉरीकशायरची क्वेफ व लँकेशायरची हॉर्नबी या पितापुत्रांची जोडीही नामवंत होती. १९२२ सालीं तर वॉरीकशायरकडून क्वेफ पितापुत्र आणि समोरच्या डर्बीशायरकडून बेस्टवीक पितापुत्र असे चौघेजण एकत्र खेळले होते !

सध्यां भारतात अमरनाथ, विनू मंकड, मुश्ताक व हजारे यांचे चिरंजीव प्रकाशांत येऊ लागले आहेत. मुलांकडून वडिलांचा असा वारसा टिकवला जातो आहे आणि थोरल्या भावाचा कित्ता धाकटा भाऊ गिरवतो आहे म्हणून तर आज क्रिकेटची परंपरा सर्वत्र टिकून राहिलेली दिसते !

● ● ●










# क्रिकेटच्या रम्य कथा

—शिरीष म. कणेकर



## वस्त्रदान ! वस्त्रदान !

क्रिकेटचे सुवर्णयुग ( Golden Age ) म्हणून ओळखल्या जाणाऱ्या कालखंडांत इंग्लंडमध्यें रिचमंड नांवाचा एक क्रिकेटपटु होऊन गेला. कसोटी-सामन्यापर्यंत स्वारीची मजल गेली नाहीं तरी कौंटी क्रिकेट-मध्यें त्यानें चांगलाच दबदबा निर्माण केला होता. स्वत:च्या खेळाविषयीं इतका जागरुक व इतका व्यवस्थित असलेला दुसरा क्रिकेटपटु आढळणें कठीण !. आपल्या प्रत्येक खेळीची, प्रत्येक धांवेची व मैदानावरील प्रत्येक हालचालीची नोंद तो करून ठेवीत असे. हीं बाडंच्या बाडं घराच्या माळचावर पडलेली असत. त्यांच्यावर तो 'रिचमंडचे क्रिकेट-१८९३' असे जाड टाईपांत लिहीत असे. दरवर्षी ह्या हस्तलिखितांत भरच पडत असे. आपल्या ह्या अमुल्य ठेव्याविषयीं विलक्षण अभिमान वाटत असे त्याला. परंतु ही हस्तलिखितं पुन्हा चाळण्याची वेळ त्याच्या-वर कधींच येत नसे; कारण आपले सर्व विक्रम त्याला तोंडपाठ असायचे.

तो एक चांगल्यापैकीं फलंदाज होता; पण त्याच्या विक्षिप्तपणाला तोड नव्हती. त्याच्या स्वत:च्या अशा कांहीं ठाम समजुती होत्या; त्यांना तो सदैव चिकटून राही. उदाहरणार्थ, विकेट 'कव्हर' करून खेळणें त्याला मुळींच आवडत नसे. खरं म्हणजे 'कव्हर' करून खेळण्याच्या पद्धतीमुळें फलंदाजीला अधिक सुरक्षितपणा येतो. पण रिचमंडला कुठलं हें पटा-यला ! तो म्हणत असे–

'अरे, 'कव्हर' करून खेळणं हे नामर्दपणाचें लक्षण आहे. माणूस कसा खुल्या दिलाचा पाहिजे.'

आतां खुल्या दिलाचा आणि 'खुल्या' विकेटचा काय संबंध हे फक्त रिचमंडच जाणत होता. रिचमंडच्या ह्या धोरणाला गोलंदाजांचा अर्थातच पाठिंबा होता. रिचमंडला बाद करण्याचा एक मार्ग त्यांना 'खुला' होता. तरीसुद्धां रिचमंडला बाद करतांना गोलंदाजांच्या नाकीं नऊ येत असत.

रिचमंडच्या विक्षिप्तपणाची आणखी एक कथा सांगितली जाते. त्याची फलंदाजी करण्याची तऱ्हा त्याच्याइतकीच विक्षिप्त होती. दहा धांवा झाल्या कीं उजव्या पायाचे पॅड सोडून रिचमंड ते अंपायरच्या हवालीं करीत असे. वीस धांवा झाल्या म्हणजे दुसऱ्या पॅडचीहिं तीच गत होत असे. पंचविशी गांठली कीं तो एक हातमोजा अंपायरपाशीं देत असे; तर तीस धावसंख्येवर दुसराहिं हातमोजा अंपायरच्या गळ्यांत पडत असे. पस्तीस धांवा झाल्यावर रिचमंड उजव्या हाताची बाही काढून टाकीत असे. चाळीशी ओलांडली कीं एखादी सनद अर्पण करावी तशी दुसऱ्या हाताची बाही अंपायरला वहाल करीत असे. अंपायरच्या दुर्दैवानें रिचमंड शिंप्याकडून असे शर्ट बनवून घेत असे कीं, ज्यांच्या बाह्या सोडवितां येत.

अंपायरला कपडे अडकविण्याची खुंटी ठरविणारी रिचमंडची मुलखावेगळी पद्धत बहुतेक अंपायर्संना माहीत होती. एका सामन्यांत मात्र एक नवाच अंपायर उभा होता. रिचमंडच्या 'वस्त्रदाना'नें तो गार पडला. चाळीस धांवसंख्येवर रिचमंडनें जेव्हां डाव्या हाताची बाही त्या अंपायरच्या हातीं दिली तेव्हां त्याच्यानें राहावेना. आपल्या मतें हळू पण प्रत्यक्षांत साऱ्या जगाला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत त्यानें एका क्षेत्ररक्षकास विचारलें–

'शतक काढल्यावर हा प्राणी कसा काय दिसतो ?'

—आणि पुढच्याच चेंडूवर रिचमंड बाद झाला.

## शतक हवें असेल तर–

बऱ्याच वर्षांपूर्वी नॉटिंगहॅमशायरकडे बिली बार्न्स नांवाचा एक तडाखेबंद फलंदाज होता. कितीतरी वर्षें तो नॉटिंगहॅमशायरचा आधार-स्तंभ होता. अत्यंत लहरी म्हणून तो प्रसिद्ध होता. आयुष्यांत जर त्यानें कोणता नियम काटेकोरपणें पाळला असेल तर तो हाच कीं कोणताहि नियम न पाळणं.

एकदां लॉर्डस्च्या मैदानावर नॉटिंगहॅमशायर विरुद्ध मिडलसेक्स असा महत्वाचा सामना होता. बार्न्स सामना सुरू होऊन गेल्यावर आला. बरं, उशीरा आला तर आला आणि वर चिक्कार पिऊन आला. चक्क झोकांड्या जात होत्या त्याच्या ! ह्या गोष्टीचा जास्त गवगवा होऊं नये म्हणून संघाच्या कर्णधारानें त्याला नेहमीप्रमाणें तिसऱ्या क्रमांकावर फलंदाजीस पाठविलें. बार्न्सच्या अंगात काय संचारलें होतें कोणास ठाऊक, त्यानें मिडलसेक्स संघाची गोलंदाजी अक्षरश: फोडून काढली. चौफेर टोलेबाजी करून पठ्ठ्यानें लंचपूर्वी अवघ्या दोन तासांत शतक फडकावलें.

पण शिस्त म्हणजे शिस्त ! मनांत नसतांना देखील कर्णधाराला बार्न्सला नॉटिंगहॅमशायरच्या कमिटीपुढें उभं करणं भाग पडलं. कमि-टीचे सदस्य म्हणजे जमीनदार, सरदार वगैरे बडीं बडीं धेंडं होतीं. आळीपाळीनें त्यांनी बार्न्सला फैलावर घेतलं—

"तुझं आजचं वर्तन अत्यंत गर्ह्य, निंद्य, तिरस्करणीय व गालबोट लावणारं आहे. आपल्या बेमुर्वतखोर वर्तनानं तूं नॉटिंगहॅमच्या क्रिकेटला



अनुक्रमणिका

म्हणजेच नॉटिंगहॅमच्या क्रिकेट-कमीटीला खाली पहायला लावले आहेस. आमच्या तोंडाला डांबर फासलयस...वगैरे वगैरे."

सगळा तोफखाना शमल्याची खात्री करून वार्न्स वरळला, (हो ! अजून पुरती उतरली नव्हती त्याची) "नाहीं म्हणजे चुकलंच माझं थोडसं. थोडसं कां चांगलंच चुकलं म्हणा कीं.अगदीं सपशेल माफी मागतो मी. पण-पण लॉर्डससारख्या मैदानावर दारु पिऊन झिंगलेला असतांना मी जर लंचपूर्वी शतक काढूं शकतो तर मला वाटतं प्रत्येक सामन्यापूर्वी माझी पिण्याची सोय करणं हे कमिटीचें कर्तव्य ठरतं. अं – नाहीं म्हणजे नॉटिंगहॅमशायरच्या क्रिकेटच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें म्हणतोय् मी."

विख्यात क्रिकेटसमीक्षक नेव्हिल कार्डस् म्हणतो तेंच खरं– "आज-कालचे क्रिकेटपटु लॉर्डसवर पिऊनहि येत नाहींत आणि लंचपूर्वी शतकहि काढीत नाहींत !"

### हाऊज दॅट नाऊ ?

लँकेशायर-यॉर्कशायर हा सामना नेहमीच अटीतटीचा होतो. पूर्वी, तर ह्या लढतीला एखाद्या कसोटी-सामन्याचें स्वरुप असायचें. विलक्षण तंग अशा वातावरणांत उभय संघांचे खेळाडू सर्वस्व पणाला लावू खेळत असत. किंबहुना ह्याच सामन्यासाठीं आपलें सर्वस्व ठेवीत असत असें म्हटलें तर जास्त संयुक्तिक ठरेल.

अशाच एका यॉर्कशायर-लँकेशायर सामन्यांत घडलेली गोष्ट आहे ही ! लँकेशायरकडे तेव्हां वॉल्टर ब्रीअर्ले नांवाचा वेगवान डावखुरा गोलंदाज होता. लँकेशायरचा हुकमी एक्का होता तो ! दिवसभर गोलंदाजी करून दमलेला ब्रीअर्ले चहापानानंतर यॉर्कशायरचा अष्टपैलू खेळाडू हर्स्ट ह्याला गोलंदाजी करीत होता. ब्रीअर्लेचा एक चेंडू हर्स्टच्या पॅडवर आदळला. ब्रीअर्लेनें जोरदार अपील केले.

"How's that ?"

अंपायरनें त्याचें अपील फेटाळून लावले. पुढच्याच चेंडूवर हर्स्टनें चौकार ठोकला.

"How's that ?" प्रेक्षक ब्रीअर्लेला चिडविण्यासाठीं ओरडले नंतरच्या चेंडूवर हर्स्टनें एक उत्तुंग षट्कार ठोकला.

"How's that Mr. Brearley ?" प्रेक्षक चेष्टेच्या सुरात ओरडले. आतां मात्र ब्रीअर्लेचा पारा चढला. दिवसभरचा सारा शीण क्षणभर बाजूला ठेवून त्यानें दांतओठ खाऊन अत्यंत वेगानें चेंडू टाकला. तुफान वेगानें टाकलेल्या त्या चेंडूनें हर्स्टच्या मधल्या यष्टीचे बरोबर दोन तुकडे केले. धांवत धांवत जाऊन ब्रीअर्लेनें ते दोन तुकडे उचलले व प्रेक्षकांच्या दिशेनें ते भिरकावीत तो तावातावानें ओरडला

"How's that now ?"

नंतर धांवतच पॅव्हिलियनमध्यें जाऊन तो सहा नव्या स्टंपस् घेऊन आला. आश्चर्यचकित झालेल्या अंपायरपाशीं स्टंप्स देत तो म्हणाला

"राहूं देत तुझ्यापाशीं. लागतील आज तुला."

—आणि त्यांतले चार स्टंप्स खरोखरच उपयोगी पडले.

### कॉमेंटेटर (तथाकथित)

पिटर वेस्ट हा इंग्लंडचा एक नांवाजलेला कॉमेन्टेटर आहे. जॉन आर्लोट, ब्रायन जॉन्सन व पिटर वेस्ट या त्रयीनें कितीतरी वर्षे उत्कृष्ट समालोचन करून क्रिकेटची सेवा केली आहे. त्याबद्दल त्यांना वेळोवेळीं धन्यवाददेखील मिळाले आहेत. बापड्या पिटर वेस्टला मात्र एकदोनदा अगदीं उलट अनुभव आला.

एकदां दिवसभर कॉमेंट्री करून दमलेला वेस्ट, आपण आपल्या श्रोत्यांच्या डोळ्यांपुढें खेळाचें हुबेहूब चित्र निर्माण केले आहे ह्या आनंदांत मशगुल होता. पॅव्हिलियनच्या पायऱ्यांपाशीच त्याला एका गृहस्थाने गांठले.

"पिटर वेस्ट आपणच का ?"

आपलं अभिनंदन करायला किंवा स्वाक्षरी घ्यायला हा गृहस्थ आला असावा अशा समजुतीनें वेस्ट विनयानें उत्तरला, "हो मीच वेस्ट."

"सामना पहात असतांनाच मी तुमची कॉमेंट्रीहि ऐकत होतो" गळ्यांतील ट्रांझिस्टर रेडिओकडे बोट दाखवीत तो गृहस्थ म्हणाला. "आणि मी तुम्हांला हें विचारूं इच्छितो कीं, मी आणि तुम्ही एकच सामना पहात होतो नं ?"

बिचारा वेस्ट केविलवाणा चेहरा करून निघून गेला.



अनुक्रमणिका








१९५३ साली इंग्लंड-ऑस्ट्रेलिया कसोटी-सामने चालू असतांना वेस्टला एक पत्र आलें. आपल्या एखाद्या चाहत्याचें पत्र असेल असें समजून तो वाचूं लागला आणि विचाऱ्याचा चेहरा आणखी एकदां केविलवाणा झाला. पत्र असें होतें—

श्री. पिटर वेस्ट यांस (तथाकथित कॉमेन्टेटर)

चालू कसोटी-सामन्यांविषयींचे तुमचे शेरे अत्यंत गलिच्छ व तिरस्करणीय आहेत. तुमच्यांत थोडी जरी सभ्यता शिल्लक असेल तर तुम्हीं राजीनामा द्यावा हे श्रेयस्कर. ट्रुमन खेळत असतांना जेव्हढी म्हणून कठोर आणि टोमणेवजा टीका करतां येईल तेवढी तुम्ही केलीत. आणि आतां हटन आणि वॉर्डल यांच्याविषयीं तुम्ही गरळ ओकीत आहांत. अर्थातच बी. बी. सी. ला मी या संबंधीं लिहिलें आहे. ह्या मताचा मी एकटाच नाहीं हेंहि लक्षांत ठेवा.

तुम्हीं इंग्रज नसाल अशी मला आशा आहे, पण दुर्दैवानें असलातच तर इथनं काळं करा.

—पत्राखालीं सही नव्हती. वेस्टनें ते पत्र अर्थातच केराच्या टोपलींत टाकले.

## जमेल तुला कधींतरी—

ऑर्थर गिलीगन ह्या इंग्लंडच्या माजी कर्णधाराविषयींच्या कथा आहेत ह्या. अनेक वेळां सांगितल्या गेलेल्या असल्या तरी त्यांच्यांतील खुमारी अद्याप कमी झालेली नाहीं.

मिडलसेक्स विरुद्ध उत्कृष्ट गोलंदाजी करून गिलीगननें सात विकेटस् घेतल्या. दिवसभरच्या श्रमानें दमून तो हिरवळीवर आरामखुर्ची टाकून बसला होता. एक आठ-दहा वर्षांची मुलगी बराच वेळ दुरूनच गिलीगनकडे पहात होती. शेवटी धीर करून ती गिलीगनपाशीं जाऊन म्हणाली.

'किती विकेटस् घेतल्यास तूं आज ?'

'सात' गिलीगन विनयानें उत्तरला.

'शाबास' ती चिटुकली म्हणाली, 'पण तूं कधी दाहीच्या दाही विकेटस् घेतल्या आहेस कां ?'

'हो ! घेतल्यायत् कीं ! पण तो सामना दुय्यम दर्जाचा होता.' गिलीगननें माहिती पुरविली.

'बरं, तू कधीं सगळ्या अकरा विकेटस् घेतल्यायस् कां ?' ह्या तिच्या प्रश्नानें गिलीगनची सपशेल दांडी उडविली. पण तिला दुखविण्याची त्याची इच्छा नसल्यानें तो म्हणाला.

'नाहीं बुवा, अकरा विकेटस् मी कधींच घेतलेल्या नाहींत'. 'हरकत नाहीं' त्याला धीर देत ती पोरगी म्हणाली, 'असाच प्रयत्न चालू ठेव. जमेल तुला कधींतरी.'

दुसरी गोष्ट गिलीगनच्या फलंदाजीविषयी आहे. द्रुतगती गोलंदाज आणि कर्णधार म्हणून गिलीगन जरी प्रसिद्ध होता तरी फलंदाजीचा त्याचा क्रमांक नेहमींच अकरावा असायचा.

एकदां सामना चालू असतांना गिलीगनला त्याच्या मित्राचा फोन आला. 'तो नुकताच फलंदाजी करायला गेलाय्' त्याला फोनवरून सांगण्यांत आले.

'कांहीं हरकत नाहीं. तो येईपर्यंत मी फोन धरून बसतो' गिलीगनची फलंदाजी जाणणारा मित्र उत्तरला.

## सासूवरच बॅट चालव—

त्याचं खरं नांव काय होतं कोणास ठाऊक पण तो प्रसिद्ध होता 'यव्वा' ह्या नांवनं. सिडनेचा रहिवासी होता 'यव्वा.' निदान सिडनेमध्यें तरी 'यव्वा' ब्रॅडमन इतकाच लोकप्रिय होता. आयुष्यांत कधीं क्रिकेटची फळी हातांत धरली नव्हती. तो एक अत्यंत रसिक असा प्रेक्षक होता, आपल्या बाबू टांगेवाल्यासारखा ! सिडनेच्या मैदानावरील एका ठराविक कोपऱ्यांत तो कित्येक वर्षे बसत आला होता. क्रिकेटमधील सगळे बारकावे त्याला माहीत होते. खेळाविषयी आपले शेरे (कीं ताशेरे) तो मोठ्या आवाजांत सगळ्यांना ऐकवीत असे. यव्वानें आवाज मात्र चांगलाच कमावला होता. तो प्रेक्षकांत आणि खेळाडूंत सारखाच प्रिय होता.

खेळ अगदीं रटाळ चाललेला असला कीं, यव्वा हमखास ओरडे.

'अरे, खेळ केव्हां सुरू होणार ?'

एका सामन्यांत कीथ मिलर गोलंदाजी करीत होता. विकेट अगदीच निर्जीव असल्यामुळें तो मध्यमगतीनें गोलंदाजी करीत होता. त्याच्या प्रत्येक चेंडूवर यव्वा ओरडे, 'वेल बोल्ड ग्रिमेट'

यांतली मख्खी अशी होती कीं, ग्रिमेट हा मंदगती गोलंदाज होता. मिलरला ग्रिमेट म्हणून संबोधण्यांत यव्वा मिलरच्या वेगाविषयीं आपलें मत सांगत होता. मिलरनेंहि हंसत हंसत हा आहेर पचविला.

एका सामन्यांत ऑस्ट्रेलियाचा प्रलयंकारी गोलंदाज 'टिबी' कॉटर प्रतिपक्षाचा धुव्वा उडवीत होता. एक सुरेख आऊट-स्वींगर टाकून कॉटरनें शेवटच्या फलंदाजाची दांडी तीनताड उडविली. एवढसं तोंड करून तो पराभूत खेळाडू परत फिरला. यव्वाला त्याची कींव आली. तो ओरडला—

'एवढं कांहीं मनाला लावून घेऊं नकोस. अरे, माझीसुद्धां त्या चेंडूनें दांडी उडविली असती.'

उलट फलंदाजांचें नंदनवन असलेल्या विकेटवर एखादा खेळाडू आपल्या मूर्खपणामुळें बाद झाला कीं यव्वा म्हणे,

'असल्या विकेटवर मी काठीनें सुद्धां खेळूं शकेन'

ह्या सर्वांवर ताण करणारा टोमणा आतां ऐका. एक खेळाडू अतिशय सावकाश खेळत होता. बेलीलासुद्धां लाज वाटली असती इतक्या धीमेपणें तो खेळत होता. प्रेक्षकांच्या नापसंतीदर्शक आरडाओरडीला तो खेळाडू दाद देत नाहीं असे पाहून यव्वा पुढे सरसावला—

'बाबारे, आपल्या सासूवरच चालवितोय अशी कल्पना करून बॅट चालव.'

—आणि त्या खेळाडूनें फटकेबाजी सुरू केली.





तुम्ही तिकडे खेळा....मी येथें फिल्डिंग करतो—









# दां...ता...पा...सू...न दां...ता...क...डें !

–लक्ष्मीदास बोरकर



**गिन्हाईकाच्या दाढीला साबण लावून झाला कीं न्हाव्याला येते चहाची लहर ! मग गिन्हाईकाची दाढी (आणि घसा) सुकून जाते.**

**मला 'दंतवैद्या'कडे तसाच अनुभव आला. किंमत मात्र जरा जबरच पडली.**

**शहाण्या** माणसानं एक वेळ आपली अक्कल गहाण ठेवावी. परंतु, चुकूनसुद्धां दांत कुणालाहि दाखवूं नये.

आपण वेडावलं असतां माकड जसं आपणांस उलट दांत विचकून दाखवतं त्या अर्थानं म्हणत नाहीं मी हो ! उगाच गैरसमज व्हायचा. मला असं सुचवायचं आहे कीं, शहाणे असाल तर दांताचा उपद्रव सुरूं झाल्यास कुठल्याहि दंतवैद्याकडे जाण्याच्या भानगडींत पडूं नका. दाढदुखी अगदींच असह्य झाली तर लवंग दाढेंत धरा. त्यानं काम भागत नसेल तर अन्य कोणतेहि घरगती उपाय करा. तेवढ्यानंहि गुण आलाच नाहीं तर गल्लीबोळांतून अगदीं स्वस्त जडबुट्टी आणून देण्याच्या सर्व रोगतज्ज्ञ 'वैदू'कडे धांव घ्या. तो आपल्या त्या दिव्य पोतडींतून कांहीं तरी असं एकादं भयंकर 'ओखद' हुडकून काढून देईल कीं त्याचा प्रयोग करतांच एक तर आपली कायमची दांतखिळी बसेल किंवा त्या दुखऱ्या दांताची पीडा घाबरून पुनः म्हणून डोकं वर काढण्याची भीति नको.

पण कोणत्याहि परिस्थितींत या आधुनिक 'दंतवैद्या'कडे (Dentist) जाण्याच्या भानगडींत पडूं नका असं माझं आग्रहाचं सांगणं आहे.

पूर्वींच्या काळांत दांत काढण्याची पद्धत अतिशय सुलभ, बिनखर्चाची अन् मजेदार होती. अर्थात्, प्राचीन युरोपमधली गोष्ट सांगतोय मी. त्यावेळीं म्हणे दांत काढण्यासाठीं आजच्यासारखीं भयंकर आयुधं नव्हतीं. ज्याचा दांत काढायचा त्या व्यक्तीला एका बिनहाताच्या स्टुलावर बसविण्यांत येई. मग जो दांत उपटून काढायचा. त्या दांताला बारीक लोखंडी तार बांधायची अन् त्या तारेचं दुसरं टोक पुढ्यांत ठेवलेल्या ऐरणीला घट्ट बांधून ठेवण्यांत येई. नंतर दंतवैद्य पुढे काय करणार याची आगाऊ कल्पना नसलेला पेशंट उत्कंठेनं त्याच्याकडे बघत रहात असे. तेवढ्यांत दंतवैद्य भट्टींत भाजून अगदीं लालीलाल झालेली लोखंडी जाडजूड सळई अकस्मात् त्या पेशंटच्या डोळ्यांसमोर खसकन् धरी. ती धगधगती सळई आपल्या डोळ्यांत जाईल या भीतीनं तो बिचारा पेशंट एकदम जोरांत मागं हटे व त्या हिसक्याबरोबर तारेनं बांधून ठेवलेला दांत निखळून येई. आपला दांत कधीं दंतपंक्तीमधून बाहेर निसटला याची त्याला गडबडींत मुळींच कल्पना येत नसे.

पण आजचं युरोप या शास्त्रांत किती तरी पुढं गेलं आहे अन् आपण प्रत्येक बाबतींत त्यांच्या पावलाबरोबर पाऊल टाकीत असल्यामुळें दांत काढण्याचीं सर्व आधुनिक शस्त्रास्त्रें आपल्याकडेहि आलेलीं आहेत. पण या आधुनिक दंतवैद्यांनीं मला जो हिसका दाखविला आहे त्याचा किस्सा जर मी आपणास सुनवला तर माझी अशी खात्री आहे कीं माझ्याप्रमाणंच आपणहि म्हणाल, 'नको रे बावा, हें असं होत असेल तर एक वेळ गांवठी उपाय परवडले, पण हें विकतचं श्राद्ध नको.

त्याचं असं झालं. माझी उजवी दाढ कित्येक वर्षांपासून कुरकुरते आहे. वास्तविक आयुष्यांत मी दातांची कधींच हेळसांड केली नाहीं. रोज दोन वेळां दांत ब्रशनं घासायचं मी थांबवलेलं नाहीं. रात्रीच्या वेळीं डोळ्यांवर झोप येत असतांनाहि मी दांतावरून मायेनं ब्रशनं फिरवायचं सोडलेलं नाहीं. तरी सुद्धां माझी उजवी एक दाढ पोखरली. ही दाढ नेहमीं माझं डोकं भंडावून सोडूं लागली. चुना-गूळ लावून दाढदुखीमुळं आलेली सूज घालविली. सगळ्यांनीं सांगितलेले सर्व उपाय करून पाहिले. परंतु, दाढेंत निर्माण झालेली पोकळी दिवसेंदिवस वाढत राहिली. पूर्वीं दाढेच्या पोकळींत शीताचे बारके कण, वगैरे छोट्या छोट्या गोष्टी अडकून राहात. पण पुढं चणे, भुईमुगाचे दाणे, मटनाचे तुकडे, माशाचे तुकडे अडकून त्रास देऊं लागले. मी मनांत म्हटलं, आतां हद्द झाली या दाढेपुढं. समूळ कोसळून पडण्यापूर्वीं घर शाकारलेलं बरं म्हणून दंतवैद्याकडे जाऊन त्यांचे पाय धरण्याचं ठरविलं. 'खाजगी दंतवैद्याकडे जाऊं नका. उगाच हेलपाटे मारावे लागतात. आज या उद्यां या करायला लावतात. करीत नाहीं कांही पण मेले बकरा

कापावा तसे पेशंटला कापून काढतात. त्यापेक्षां मोफत हॉस्पिटलांत जा. तेथें उगाचं ताटकळत ठेवत नाहींत. एक घाव दोन तुकडे. दांत काढायचा असला तर एकाच खेपेंत काम फत्ते.' असा साळसूद उपदेश सौ. नं केला. खिशाच्या दृष्टीनं सोयीस्कर असल्यामुळं मी तो एकदम मान्य केला.

चांगलासा मुहूर्त पाहून एका नामांकित मोफत हॉस्पिटलांत गेलों. दांत शस्त्रक्रिया विभाग हुडकून काढतां काढतां पाय थकले. आवारांत लोकांना विचारून विचारून माझं तोंड दमलं. एकानं तर मला दंतशस्त्रक्रिया विभाग म्हणून चक्क प्रेतागाराकडे नेऊन पोचविलं. तेथील तीं अंगावर शहारे आणणारीं दृश्यें पाहाण्याचा दुर्धर प्रसंग ओढवल्यामुळं मी त्या वाटाड्यावर दांतओठ खाल्ले. अखेर एका मेडिकल कॉलेज विद्यार्थ्यानं मला अचूक मार्गदर्शन केलं अन् मी एकदांचा 'दंत' विभागांत येऊन थडकलों. विभागाचा मुख्य दरवाजा बंद होता. परंतु, तो पारदर्शक कांचांचा असल्यामुळं आंतील सर्व कांहीं स्पष्ट दिसत होतं. प्रथम आपण चुकून एखाद्या सलूनच्या दरवाजांत तर उभे नाहीं ना असा मला ओझरता भास झाला. कारण सलूनमधील फिरत्या खुर्च्यांप्रमाणं कित्येक खुर्च्या तिथं होत्या. दाढी करून घेताना माना टेकवून आपण बसतों तसे कित्येक लोक त्या खुर्च्यांत बसलेले होते व हातांत न्हाव्याच्या हजामतीच्या वस्तऱ्यासारखीं व केस कापण्याच्या आधुनिक कात्रीसारखीं कसलीं तरी शस्त्रें घेऊन लांबलचक सफेत झगे घातलेले तरुण त्यांच्यावर कसलंतरी कलाकुसरीचं काम करण्यांत गर्क झालेले आढळले. सलूनमधील अपटुडेट न्हावी जसा 'एप्रन' चढवतात त्याच नमुन्याचे 'एप्रन' त्या तरुणांच्या अंगांत होते. चौकशीअंतीं मला असं समजलं कीं, ते न्हावी नसून डेन्टल कॉलेजचे होतकरू विद्यार्थी आहेत. दांत काढण्याच्या प्रात्यक्षिकाचं ज्ञान मिळविण्यासाठीं ते तेथें राबत होते. प्रथम मला भीति वाटली. असल्या होतकरू मंडळीच्या हातीं माझी दाढ द्यायची कीं काय ? पण त्याला दुसरा इलाज नव्हता. फुकट तर हवं. वर मिजास आणायला कशी मिळणार ? इतर लोक नाहीं का निःशंकपणं आपले दांत त्यांच्या स्वाधीन करीत? तसंच मीहि करीन.

बऱ्याच वेळानं माझा नंबर लागला. दंतवैद्यानं केसपेपर काढला, माझी बत्तीशी नीट पाहून घेतली व दुखरी दाढ काढून टाकायलाच हवी असं सांगितलं. केसपेपर घेऊन वॉर्ड नं. १३ मध्यें जा असं त्यानीं फर्मावलं. वॉर्ड बॉयना विचारीत मी वॉर्ड नं. १३ मध्यें येऊन थडकलों. अरेच्चा ! हें काय लचांड ? नेमका मी त्या मघाशीं पाहिलेल्या 'सलून'मध्येंच येऊन पोचलों होतों. केसपेपर दाखविल्यावर मला एका फिरत्या खुर्चीत बसविण्यांत आलं. माझ्या वांट्याला आलेला 'कारागीर' भलताच रोमँटीक होता. माझ्या शेजारच्या खुर्चीवर त्याच्याच वर्गातील एक विद्यार्थिनी एका पेशंटचे दांत उपटीत बसली होती व या दोघांचं दांत उपटण्याचं काम चालू असतांना प्रणयाचे खेळ खेळण्याचं काम चाललं होतं. त्यानं मला एक इंजेक्शन दिलं व थोडा वेळ तो त्या मुलीशीं पुनः गप्पा छाटूं लागला. मला पुनः सलूनमधील न्हाव्यांची आठवण झाली. तेहि पण असंच करतात. अर्धी दाढी होते न होते यांना पान खायची किंवा शेजारच्या दोस्तावरोबर गोष्टी बोलण्याची हुक्की येते. तसंच येथेंहि चाललं होतं. माझी दाढच नव्हे तर संपूर्ण दांतखिळी बधीर झाली तरी त्या प्रेमवीराचं कुंजन संपेना. अखेर मी त्याचं दांतावर दांत वाजवून माझ्याकडे लक्ष वेधून घेतलं. त्यावरोबर त्यानं घाईघाईनं आपलीं शस्त्रं उचललीं व केसपेपरवर धड लक्ष न देतां घाईघाईनं माझी दाढ उपटली. मी एकदम जोरांत ओरडलों अन् बेशुद्ध पडलों. शुद्धीवर आल्यावर मला समजलं कीं, त्या बहाद्दर कारागिरानं गडबडींत उजव्या दाढेऐवजीं माझी चांगली डावी दाढ समूळ उपटून टाकली होती.

☆ ☆ ☆



## चेंडू अडकला म्हणून

इ. स. १८७८ सालीं ग्लूसेस्टरशायरकडून खेळतांना डब्ल्यू. जी. ग्रेस नामक विख्यात क्रिकेटपटु स्वतःच अत्यंत कठीण अशा पेचांत सांपडले होते. ग्रेस हे फलंदाजी करीत असतांना त्यांच्या सहकाऱ्यानें फटका मारला व त्यावर तिसरी धांव पुरी करत असतांना क्षेत्ररक्षकानें फेंकलेला चेंडू उडून डब्ल्यू. जी. ग्रेस यांच्या सदऱ्याच्या वर केलेल्या बाह्यांत जाऊन अडकला. तो चेंडू तसाच घेऊन त्यांनीं आणखीन तीन धांवा काढल्या. या विचित्र परिस्थितींतून कुणालाच मार्ग काढतां येईना. नियमाप्रमाणें क्षेत्ररक्षकांना ग्रेसना अडवून चेंडू काढून घेतां येईना. त्याचप्रमाणें चेंडू 'निर्जीव' (Dead)) नसल्यानें ग्रेसनाहि तो काढतां येईना. कारण तसें जर त्यांनीं केले असते तर नियमाप्रमाणें ते बाद झाले असते. शेवटीं ग्रेसनीच या प्रसंगांतून तोड काढली. विकेटपाशीं ते थांबले व त्यांनीं क्षेत्ररक्षकास चेंडू काढून घेण्यास सांगितलें.

या प्रसंगामुळेंच एम. सी. सी. च्या नियमांत आणखी एका उपनियमाची भर पडली. तो नियम असा – फलंदाजाच्या पॅडस्‌मध्यें वा सदऱ्यामध्यें चेंडू अडकून बसला असतां तो निर्जीव (Dead) असा समजण्यांत यावा. नियम नं. २५ (निर्जीव चेंडू म्हणजे ज्यावर कोणताहि निर्णय–बाद, धांवा वगैरे–होऊं शकत नाहीं असा. गोलंदाज गोलंदाजी करण्यासाठीं सुरुवात करतो तेव्हां हा चेंडू जिवंत होतो.)

–सदानंद चेंदवणकर



अनुक्रमणिका

# क्रिकेटवर बंदी ?

—मनोहर राखे



[पारितोषिकाचा खास लेख]

**फेब्रुवारी १९६४ च्या 'दीपावली' त क्रिकेट पुरवणी प्रसिद्ध झाली होती. तींत श्री. 'तिरंदाज' यांचा "क्रिकेटवर बंदी कां घालूं नये"? ह्या शीर्षकाचा एक लेख प्रसिद्ध झाला होता. क्रिकेट रसिकांच्या त्या लेखावरील प्रतिक्रिया आम्ही मागवल्या होत्या, व त्यांतील उत्तम लेखाला दहा रुपये पारितोषिकही जाहीर केलें होते. श्री. राखे ह्यांचा लेख सर्वोत्कृष्ट ठरला असून त्यांना पारितोषिक देण्यांत आले आहे. परीक्षक म्हणून सुप्रसिद्ध क्रिकेट-टीकाकार श्री. बाळ ज. पंडित ह्यांनीं काम केले. 'दीपावली' त्यांची ऋणी आहे.**

**—संपादक**

**आपल्या** फेब्रुवारी ६४ च्या अंकांत क्रिकेटवर बंदी कां घालं नये या लेखावर माझीं मतें खालीलप्रमाणें आहेत.

सर्व प्रथम क्रिकेटवर बंदी घालण्याची भाषा, **कुठलाही थंड डोक्यानें विचार करणारा** माणूस करणार नाहीं. दुसरे म्हणजे, सर्व लेख वाचला म्हणजे असें लक्षांत येतें कीं **आजुबाजूची परिस्थिति लक्षांत न घेतां केवळ निराशा अगर दूषित पूर्वग्रह यावरच लेखकानें** हा लेख लिहिला आहे. सुरुवातीपासूनच पाहूं.

लेखक पहिल्या परिच्छेदांत म्हणतो "भारतापुढील... देशसेवा साधतां येईल." हे लिहितांना लेखकानें, कांहीं दिवसांपूर्वी राष्ट्रीय संरक्षण निधिसाठीं झालेली मॅच व नंतर २८, २९, १ व २ तारखेस झालेली मॅच लक्षांत घेतलेली दिसत नाहीं. पहिल्या मॅचनें (फक्त मुंबईच्या, अहमदावाद वगैरे ठिकाणीं झालेल्या मॅचेस सोडून) राष्ट्रीय संरक्षणनिधीला जी भरघोस मदत, गुंतवणूक व रोख यांच्या रूपांत दिलेली आहे **तिच्याकडे दुर्लक्ष करणें म्हणजे क्रिकेटशीं कृतघ्न बनण्यासारखें आहे.** क्रिकेटवर अवाढव्य खर्च होतो हें विधान अतिरेकी थाटाचें आहे. अर्थातच तो खर्च योजनेकड़े वळविण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. तसेंच, काय यापूर्वी कठीण परिस्थिति आपल्या देशावर आली नव्हतीच का? तेव्हां कोठें क्रिकेट नाहीं बंद करावे लागलें तें? याला कदाचित् उत्तर म्हणून त्यावेळचे क्रिकेट जोरदार होतें असें विधान केलें जाईल. पण सध्यां प्रश्न आणीवाणी गंभीर परिस्थिति व खेळावर होणारा खर्च हा आहे. हं, आ त्यावेळेपेक्षां खर्च वाढला असेल. पण तो सगळीकडेच वाढ आहे. फक्त येथेंच नाहीं (म्हणजे इथेंच वाढला आहे असें नाहं आणि देशाच्या संरक्षण निधीस हातभार लावणारा खेळ करणें ह्याला खात्रीनें कोणी देशभक्ति म्हणणार नाहीं.

दुसऱ्या परिच्छेदांत केलेला आंकड्याचा खेळ गंमतीशीरच अ अहो क्रिकेटमध्यें एका वेळेला एका दिवसाला २२ हजार मा सांचे ५ तास फुकट जातात असे लेखक म्हणतो. पण तेवढ्यासाठ त्यावर बंदी घालणें कितपत संयुक्तिक आहे? कारण मुंबईसार शहरी माणसांचे सिनेमा नाटकांत किती तास फुकट(?) जात याचा हिशोब कोणी आकडेशास्त्रज्ञानें काढला व त्याआधारे सिन नाटकावरहि बंदी घाला असें जर कोणी तर्कट म्हणाला तर क काय बोलणार'?

क्रिकेटची मॅच पहाणे म्हणजे वेळ फुकट घालविणें हा स शंभर टक्के चुकीचा आहे. कारण मग तसें म्हटलें तर प्रत कामाशिवाय आणि इतर आवश्यक बाबींखेरीजचा वेळ फुंक नाहीं का जाणार? लोक क्रिकेट बघतात ते वेळ फुकट घालव म्हणून नव्हे तर करमणूक म्हणून. क्रिकेटला जास्त वेळ ला असेल. पण म्हणून काय त्यावर बंदी घालायची?

एका फुटबॉलच्या....कधीतरी दिसतें का? हें विधान अ सत्य आहे. कारण त्या खेळाचा वेळ थोडा असल्यानें जें काय वाईट घडतें तें थोड्या वेळांत घडतें म्हणून साहजिकच त्य खळबळ जास्त माजते. चालूं दे हॉकीचा खेळ पांच दिवस वि क्रिकेटचा एक दिवस (वेळ विभागून म्हणजे दोन्ही संघांना जास जास्त ३ तासच खेळावयाचें) बघा काय परिणाम होतो तो !

पण भारतांतले....दर्शन घडणार नाहीं हें विधान तर च असत्याकडे झुकणारें आहे. अर्थात् त्यांत थोडा सत्याचा अंश हें कबूल करावेंच लागेल. पण नुकत्याच झालेल्या इंग्लंड-भ मुंबई टेस्टमध्यें पहिलें तीन दिवस जें काय घडलें तें काय मिळीत होतें ? त्यांत काय धडाडी नव्हती? तुफानी गोलंदाज नाहींत याचे विवेचन, एक इंग्लिश खेळाडू जिम् पार्कस या मोहिनीच्या अंकांत आलेल्या मुलाखतींत आहे तें जरूर वा जलद्गति गोलंदाज हवे असतील तर पिचेस व इतर परिस्

अनुकूल हवी. क्रिकेटवर बंदी घालणें हा त्यावरचा उपाय नव्हे.
कव्हरड्राइव्ह अगर पट्‌काराविषयीं विधान केवळ बेजबाबदार-
पणाचें द्योतक आहे. (पूर्वीच्या मॅचेस सोडा पण या 'सिरीज'मधला
एकटया जयसिंहाचा खेळच ह्या विधानाला षट्‌कार मारून हद्दपार
करण्यास समर्थ आहे. इतरांची बातच सोडा. बक्षिसांचें म्हणावयाचें
झालें तर वेस्ट इंडिज विरुद्ध झळकविलेल्या १०० व ९६ धांवां-
बद्दल त्याला मिळालेलें घडयाळ व चार हजार रुपये (दोन्हीही
बडोद्याच्या महाराजांनी दिलेली) व नुकतेंच पतौडीस मिळालेलें
घडयाळ (फ्री प्रेस मधला त्याचा द्वीशतकानंतरचा फोटो पहा)
त्या गोष्टी त्या विधानांचा फोलपणा पटवितील. आकर्षक खेळ
दिसत नाहीं असें म्हणणें धाष्टर्याचेच होईल. "हल्लींचा खेळ...
जिंकण्याची ईर्षाच नाहीं" या विधानाला उत्तर म्हणजे मोहिनीतली
जिम् पार्क्सची मुलाखत. त्यानें भारतातली पिचेस जलदगति गोलं-
दाजांची वानवा इत्यादिचें केलेलें विवेचन वाचणें तिरंदाजांसाठीं
अत्यंत जरूरीचे आहे. फास्ट बोलर्स जर आम्हांला फक्त परक्यांच्या
संघाविरुद्ध खेळतांनाच खेळावयास मिळतात तर आम्हांला त्यांचा
सराव व्हावा कसा व आम्ही खेळावें कसें? यावरचा उपाय फास्ट
बोलर्स तयार करणें हा आहे. क्रिकेट बंद करणें हा नव्हे. सामना
संपत नाहीं याचें कारण माहिती आहे? कानपूरच्या एका
(U.P. Cricket Association's Official) गृहस्थाचे (ज्याच्या
विधानाला फार किंमत आहे.) विधान पहा" "We are
paying two lakhs rupees as guarantee money. We
just can't take chances by preparing a wicket
which may break up and cut the duration of the
match by a day or two." ह्या विधानाची सत्यता पहा
वयाची असेल तर १५ फेब्रुवारीचा फ्री प्रेस पहा (शेवटच्या
पानावर चौथा कॉलम) हा दोष क्रिकेटचा, का क्रिकेट खेळणारांचा
आहे? ह्या परिस्थितींत क्रिकेट बंद करणें म्हणजे चोर सोडून
संन्याशाला सुळीं देण्यासारखें आहे.

भारतानें खाल्लेल्या पराभवांत जास्त संख्या परदेशांतीलच,
कारण विकेटस् व फास्ट बोलर्स. पण याहि बाबतींत क्रिकेट बंद
करणें हा खासच उपाय नव्हे. यावरचा उपायहि मला वाटतें जिम्
पार्क्सनेंच त्याच्या मुलाखतींत सुचविलेला आहे.

अरे दर्जा खालावला तर तो सुधारायचा का तो खेळच बंद
करावयाचा?

क्रिकेटनें नांव उंच केलें नाहीं हें विधान परत अर्धसत्य आहे.
हें विधान करतांना हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं एखादा खेळ
देशाला नांव मिळवून देतो म्हणजे तो देश उत्तमोत्तम खेळाडू
जगासमोर ठेवतो व जग त्यांची व पर्यायानें देशाची वाहवा करतो.
अशा परिस्थितीत आपल्या उत्तमोत्तम खेळाडूंचीं नांवें लेखकानेंच
दिली आहेत. मग प्रश्नच मिटला.

क्रिकेटला भांडवलवाल्यांचा खेळ म्हणण्यांत काय चातुर्य आहे हेंच
मला समजत नाहीं आणि समजा जरी तो भांडवलवाल्यांचा असला
तरी समाजवाद असें कांहीं सांगत नाहीं कीं भांडवलवाल्यांच्या
चांगल्या गोष्टीचाहि त्याग करा म्हणून.

क्रिकेटचा खेळ गांवोगांवी गलेला नाहीं हें विधान हास्यास्पद
आहे हें एखादा खेडूत पोरगाच सांगेल. आणि समजा जरी त्याला
क्रिकेट खेळ माहित नसला तरी त्याला फुटबॉल, टेनिस, हॉकी हे
खेळ विचारून बघा खात्रीनें तेहि त्याला माहित नसतील. हा
जेव्हां (लेखकाच्या विधानाप्रमाणें) खेडोपाडीं पसरेल तेव्हां आपो-
आपच राजा बनेल. त्याला कोणीही राजा बनवावा लागणार नाहीं.

गरीबांचे हात बॅटी धरूं शकत नाहींत. तसेंच ते हॉकीस्टीकही
धरूं शकत नाहींत. टेनिसची रॅकेटही धरूं शकत नाहींत. मग
तेच का पाहिजेत, क्रिकेटच कां नको?

क्रिकेटची प्रगति झाली नाहीं तर तो बंद करावा असें म्हणणें
म्हणजे मुलाची तब्बेत सुधारत नाहीं म्हणून त्याला मारून टाका
म्हणण्यासारखेंच तर्कट विचार बुद्धीचे द्योतक आहे. मुलाच्या
बाबतींत औषधांत अगर टॉनिकमध्यें योग्य तो बदल करणें जसें
संयुक्तिक आहे, तसेंच क्रिकेटच्या बाबतींत तथाकथित क्रिकेट संस्थाना-
मधील राजकारण व अवास्तव खर्च (!) कमी करणें हा उपाय
संयुक्तिक अगर धोरणी आहे. जलदगति गोलंदाजाबद्दल केलेलें
विधान करण्यामागचा हेतूच मला समजत नाहीं. रोपटें चांगलें
वाढायला पाहिजे असेल तर त्याच्या खत पाण्याचा खर्च करावयास
नको काय?

आजचें जग धावतें झालें आहे. पण अशा धावण्यांत जे श्रम पड-
तात त्यावर विरंगुळा म्हणूनच हा खेळ आहे. "पांच पांच तासांचा
खेळ कोण बघेल" हें विधान करण्यापूर्वी लेखकानें एक तरी टेस्ट
मॅच बघावी! जे ३५–४० हजार लोक येतात ते काय उगीच!

देशाला गोलंदाज हवेत याचा अर्थ क्रिकेटमधले गोलंदाज नकोत
असा अर्थ काढणाऱ्याला काय म्हणावयाचे? खेळ महागडा आहे असें
म्हणण्यांत कांहींच तथ्य नाहीं. (प्रेक्षकांच्या दृष्टीनें) कारण सिनेमाचें
तिकीट काय पैशाशिवाय मिळते? त्याला काय खर्च होत नाहीं.

म्हणूनच काळाची पावलं ओळखणारा कोणीही सूज्ञ असेंच
म्हणेल कीं आज देशांत क्रिकेटचा खेळ बंद करण्याची १% सुद्धां
जरूरी नाहीं. जरूर आहे ती फक्त जरा बदलत्या धोरणाची–
चांगल्या पिचेसची.

माझी वरील मतें आहेत.

एका चांगल्या प्रश्नाला (जो वास्तविक अजिबात प्रश्नच नाहीं
पण या निराशावादी तिरंदाजांवर नेमबाजी करण्याची संधी आहे)
तोंड फोडल्याबद्दल संपादकांना धन्यवाद. ✿ ✿





मुंबईच्या हवेंत उकाडा फार, त्यांतल्या त्यांत नोव्हेंबर डिसेंबर या दोन महिन्यांत हवा सुखकर वाटते. दिवाळी आणि नाताळ या दोन सणांचें आगमनहि याच वेळेला होत असल्यानें आनंदांत आणखी भर पडते. मला हे दोन महिने विशेष आवडतात याचें कारण मात्र या सुमारास उत्तमोत्तम निवडक चांगलीं चित्रें मुंबईत प्रकाशित होत असतात हें आहे ! 'मुव्ह ओव्हर डार्लिंग', 'क्रॅक्समन', 'हू इज बेरीड इन् माय ग्रेव्ह', 'हातारी', 'बाय बाय बर्डि', 'फिफ्टी फाईव्ह डेज़ इन् पेकिंग', 'किसेस फॉर माय प्रेसिडेंट डायव्होर्स इटालियन स्टाईल !' हीं असामान्य चित्रें माझ्या विधानास साक्ष आहेत. आतां दीपावलीच्या वाचकांस या महिन्यांत दाखल होणाऱ्या चित्रपटांचा परिचय करून देत आहे.



## वंडरफुल लाईफ !

वॉर्नर ब्रदर्स चित्रसंस्थेमार्फत ए. बी. पाथे, कंपनी निर्मित 'वंडरफुल लाईफ' हें आनंदी रंगीत संगीत आणि नृत्यप्रधान चित्र आतां मुंबईंत इरॉसला येत असून त्यामध्यें क्लिफ रिचर्ड ह्या नामवंत चित्रताऱ्यानें गायिलेलीं १२ गाणीं म्हणजे चित्ररसिकांना संगीताची एक अपूर्व अशी मेजवानीच आहे ! खेळकर वातावरणांतील हें चित्र क्लिफच्या उत्साही आनंदी घडपड्या अशा नायकाच्या भूमिकेनें विशेष गाजलें आहे. सारा वेळ पडद्यावर त्याची उपस्थिति आहे असें म्हटलें तरी चालेल. विशेषत: चित्रपटसृष्टीचा इतिहास दाखविला आहे त्या प्रसंगांत क्लिफनें हॉलीवुडच्या जुन्या प्रसिद्ध चित्रताऱ्यांची जी हुबेहूब नक्कल करून दाखविली आहे त्यानें प्रेक्षकवर्ग थक्क होऊन जातो. रॉडॉल्फ व्हॅलेंटिनो, ग्रुशो मार्क्स आणि डग्लस फेअर बँक्स (थोरली पाती) हे जुने गाजलेले चित्रतारे त्यानें अगदीं आश्चर्यकारक पद्धतीनें साकार करून दाखविले आहेत. हें यशस्वी चित्र म्हणजे क्लिफचा 'एकपात्री प्रयोग' आहे आणि तो प्रयोग करण्यांत त्यानें अपूर्व यश मिळविलें आहे!

सिडने जे फ्यूरी या दिग्दर्शकानें हें चित्र मोठ्या कौशल्यानें हाताळलें आहे! ★

**वंडरफुल लाईफ या चित्रपटांतील एक प्रणय प्रसंग.**

अनुक्रमणिका

टॉम ट्रायॉन हा अभिनेता आणि कॅरोल लिन्ले ही अभिनेत्री 'कार्डिनल' या कोलंबिया चित्रांत





'अग्ली अमेरिकन' या रंगीन चित्रपटांत मार्लोन ब्रांडो व ऐजी ओकाडा

# कार्डिनल

**रीगलमध्यें** कोलंबिया चित्रसंस्थेतर्फे प्रविष्ट होणारें '**कार्डिनल**' हें बहुरंगी चित्र अनेक वैशिष्ट्यांनीं नटलेलें आहे.

कार्डिनल ही कादंबरी हेन्री मॉर्टन रॉबिन्सन या सुप्रसिद्ध लेखकाची. १९५० सालीं प्रसिद्ध झालेल्या या कादंबरीनें साहित्यसृष्टींत प्रचंड खळबळ उडवून दिली होती. लोकप्रियतेमुळें या कादंबरीच्या अनेक आवृत्त्या निघाल्या इतकेंच नव्हे तर जगांतील वेगवेगळ्या पंधरा भाषांमध्यें भाषांतरें निघून ती लोकप्रिय ठरली.

एक कॅथॉलिक पंथीय धर्मगुरूला मोहावर आणि भोगावर विजय मिळवितांना किती यातना सहन कराव्या लागतात हा कथाविषय आहे. जगांतील सर्व मानव एकाच समपातळीवर आहेत असें म्हणतांना फार बरें वाटतें, परंतु हें तत्त्व आचरणांत आणण्यास किती कष्ट किती यातना सहन कराव्या लागतात याचें हृद्य असें चित्रण करण्यांत या चित्राचा दिग्दर्शक निर्माता ऑटो प्रेमिजर कमालीचा यशस्वी ठरला आहे! टॉम ट्रॉयॉन या कलावंतानें प्रमुख भूमिका वठविली असून आपल्या अंतर्मनामधील संघर्ष प्रकट करण्यांत त्यानें अभिनय-कौशल्य पणास लावलें आहे. कथाविषयाला अनुरूप असा इतर कलावंतांचा संचहि हजर आहे. रोमी साईडर, कॅरोल लिन्ले, जिल् हॅवॅरथ, जॉन सॅक्सन हे कलावंत या चित्रपटांत चमकतांना दिसत असून विशेष कौतुकाची गोष्ट म्हणजे दिग्दर्शक जॉन हस्टन यांना या चित्रांत एका पाद्रयाची भूमिका देण्यांत आली आहे. एक प्रथितयश असा दिग्दर्शक दुसऱ्या दिग्दर्शकाच्या चित्रांत भूमिका स्वीकारतो हा चमत्कार दिग्दर्शक ऑटो प्रेमिजरनें करून दाखविला आहे. कारण त्याचें प्रत्येक चित्र कांहींतरी चमत्कृतीनें नाविन्यानें नटलेलें असतें! त्याचे अगोदरचे गाजलेले चित्रपट म्हणजे, 'अॅनॉटमी ऑफ ए मर्डर', 'अॅडव्हाईस अॅंड कन्सेंट', 'कारमेन जोन्स', 'दि मॅन वुइथ दि गोल्डन आर्म', इ. या त्याच्या चित्रकृति खूपच नांवाजल्या गेल्या आहेत. उत्कृष्ट छायालेखनाबद्दल अकादमीकडून तीन वेळेला पारितोषिकें मिळविलेले छायाचित्रकार लिऑन शॅमरॉय यांनीं पॅनव्हिजन पद्धतीवर चित्रित केलेल्या या अनेकरंगीं चित्रांत न्यू इंग्लंड, व्हिएन्ना, रोम अशा सौंदर्ययुक्त शहरामधील नयनमनोहर दृश्यें दिसतील. ★

# अग्ली अमेरिकन!

**मेट्रो** चित्रगृहांत दाखल होणाऱ्या युनिव्हर्सल स्टुडिओच्या रंगीत चित्रांत मार्लन ब्रॅंडो हा चित्रतारा चमकला आहे. नेहमीं वेडयावांकडया गबाळया पोषाखांत पडद्यावर अवतरणारा हा कलावंत या चित्रांत मात्र सूटबूट टाय अशा टापटीपीच्या पोषाखांत वावरतांना दिसतो ही एक वेगळी मजा आहे. पूर्वदक्षिण आशियामध्यें नेमणूक झालेल्या राजदूताची भूमिका ब्रॅंडोनें दर्जेदार स्वरूपांत प्रकट केली असून तो या चित्रांत आपल्या अभिनय कौशल्याची सामर्थ्याची प्रचिती पटवून देतो. त्याच्याबरोबर भूमिका करणाऱ्या कलावंतांची निवडसुद्धां मोठ्या चोखंदळ चौकस बुद्धीनें आणि यौजकतेनें केली असल्यामुळें चित्रास खूप उठाव येतो. सॅन्ड्रा चर्च ही अभिनेत्री ब्रॉडवेच्या रंगभूमीवरून 'जिप्सी' या गाजलेल्या संगीत नाटकांत नायिकेची भूमिका करून नांवलौकिकास चढली. या चित्रांत तिनें नायिकेची भूमिका मोठ्या जिद्दीनें वठविली कीं 'ब्रॅंडो-चर्च' ही नायक-नायिकेची जोडी तुफान यशस्वी ठरली! ऐजी ओकाडा हा जपानी चित्रतारा या चित्रांत प्रामुख्यानें चमकला आहे.

आशियांतील अनिश्चित स्वरूपाच्या नाजूक राजकीय पार्श्वभूमीवर आधारलेल्या '**अग्ली अमेरिकन**' या प्रसिद्ध कादंबरीवरून हें चित्र तयार करण्यांत निर्माता-दिग्दर्शक जॉर्ज इंग्लंड यानें फार मोठी जबाबदारी आणि तेवढाच मोठा धोका पत्करला होता. पस्तीस एकराच्या विस्तीर्ण जागेवर खेडेगांवचा एक वास्तवपूर्ण देखावा उभा करण्यांत आला त्याला खर्च आला दोन लक्ष सत्तर हजार डॉलर्स. तिथें उभें राहिलें तर खरोखरीच असें वाटें कीं आपण आशियामधल्या एका खेडेगांवांत फिरत आहोंत. शिवाय युनिव्हर्सलच्या





अनुक्रमणिका

मोठ्या स्टेजवर आणखी एक जंगलाचा देखावा कलापूर्ण पद्धतीनें उभा करावयास आलेला खर्च दीड लक्ष डॉलर्स. वास्तवतेसाठीं हा खर्च आवश्यक असाच होता. कलावंतांचें एक स्वतंत्र पथक थायलॅंडमध्यें तीन महिने राहिलें होतें. तेथील भातशेतीचीं मनोहर दृश्यें आणि बँकॉकच्या चित्रविचित्र देवळांचें सोनेरी कळस हीं या चित्राचीं रसिकांना एक अपूर्व भेट ठरेल यांत शंका नाहीं. दिग्दर्शक इंग्लंड यांच्या प्रचंड मेहनतीचें, दगदगीचें आणि कला कुशलतेचें सार्थक झालें आणि हें चित्र अपूर्व यशदायी ठरलें ! **अग्ली अमेरिकन** ही एक प्रमेयप्रधान विचार प्रवर्तक अशी चित्रकृति ठरली आहे !

★




चार चक्रम–बीटलस्

# बीटलस-चार चक्रम !

इंग्लंड अमेरिकेमध्यें ज्यांच्या गाण्याच्या लक्षावधी रेकॉर्ड्स खपत आहेत आणि ज्यांच्या स्वरालापीनें शाळाकॉलेजमधील मुलें मुलीं आनंदानें बेफाम होऊन किंचाळत सुटतात ते चार चक्रम **'बीटल्स'** या नांवानें आतां जगभर प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचीं वयें केवळ २० तें २२ वर्षांपर्यंतची आहेत. डोक्याचे केस वेडेवांकडे वाढलेल्या या चार लहान कलावंतांना रेकॉर्डस्ची रॉयल्टी म्हणून इतकी संपत्ति मिळते कीं ब्रिटनमधल्या कोणत्याहि व्यक्तीला एव्हढे पैसे मिळत नाहींत! त्यांच्या गायनाच्या जलशांना प्रचंड हाऊसफुल्ल गर्दी जमते त्यांचें उत्पन्न वेगळेंच ! त्यांना आतां इतक्या संपत्तीचें काय करावें हा मोठा प्रश्न पडला आहे. संपत्तीमुळें अगर प्रसिद्धीमुळें त्यांचीं डोकीं फिरलीं नाहींत किंवा उन्मत्तपणा आणि अहंकार या दुर्गुणांचा त्यांनीं आपणांस स्पर्शहि होऊं दिला नाहीं ! परंतु त्यांच्या नशिबांत बंदीवास मात्र लिहिला आहे. आपल्या लोकप्रियतेमुळें त्यांना हा बन्दीवास पत्करावा लागतो. त्यांना रस्त्यानें पायीं अगर मोटारीनें प्रवास करतां येत नाहीं. कारण लगेच रसिकांचे तांडे जमा होतात. त्यांना छानदार हॉटेलमध्यें जेवण घेतां येत नाहीं. त्यांना थिएटरमध्यें जाऊन नाटक पहातां येत नाहीं. सिनेमा पहातां येत नाहीं ! त्यांच्या भोंवतीचीं गर्दी पांगून त्यांची सुखरूप सुटका करणें पोलिसांनासुद्धां फार जड पडते.

हे चार चक्रम आतां चित्रपटसृष्टींत पदार्पण करीत असून त्यांचें पहिलें चित्र **'ए हार्ड डेज् नाईट'** आतां रीगल चित्रपटगृहांत या महिन्यांत सादर होत आहे. या संगीत चित्रपटांत त्यांचीं नवीं सहा गाणीं ऐकावयास मिळणार असून त्यामुळें चित्रपटाच्या विनोदी धाटणींत मोलाची भर पडली आहे. या चित्राचे निर्माते वॉल्टर शेनॉन असून दिग्दर्शक रिचर्ड लेसर आहेत. इंग्लंडमध्यें ह्या चित्रपटाचें उद्घाटन करण्याकरितां राजकन्या मार्गारेट खास हजर होती. हें चित्र युनायटेड आर्टिस्ट या मान्यवर अशा चित्र संस्थेतर्फें प्रकाशित होत आहे.

**–के. टी.**

## नव्या सृजनाचा हुंकार

'**आसवांचा ठेवा**' हा मधुकर केचे यांचा तिसरा कविता संग्रह. केचे यांच्या 'दिंडी गेली पुढें' आणि 'पुनवेंचा थेंब' या दोन कविता संग्रहांत दिसून येणाऱ्या सामर्थ्याचा विकास कांहींसा स्थिरावून त्याचा विस्तार सुरूं झाल्याचें जाणवतें' अशा अर्थाचा अभिप्राय प्रस्तावनेंत सौ. शिरीष पै यांनीं सूचकतेनें नमूद केला आहे. भावनेच्या कढाबरोबरच अभंगांतून बौद्धिक निष्कर्ष निघूं लागतात तेव्हां आत्मसंशोधनाची आवश्यकता आहे किंवा केचे यांच्या कवितेला पुष्कळ वेळां उखाण्यांत बोलण्याची संवय लागली आहे, या सारख्या सौ. शिरीषबाईंनी व्यक्त केलेल्या मतांशीं कोणीहि सूज्ञ वाचक सहमत होऊं शकेल.

आधुनिक मराठी कवितेंत रे. ना. वा. टिळक आणि अलीकडील काव्यांत विंदा करंदीकर यांच्या नंतरची प्रभावी अभंग रचना करणारे कवि म्हणून 'मधुकर केचे' यांचेंच नांव प्रसिद्ध आहे. पण करंदीकरांचे अभंग उपरोध, आणि उपहास, यांनी विजेच्या आसुडासारखे जहाल बनलेले आहेत, तर केचे यांच्या अभंगांत तोच उपरोध सौम्य आणि सलणाऱ्या कांट्याप्रमाणें नाजुक टोंचणी निर्माण करणारा बनला आहे.

कांहींसा नास्तिक बेरडपणा आणि मानवी मूल्यांवरील ढळलेली श्रद्धा ही करंदीकरांच्या अभंगांत दिसते, तर मधुकर केचे यांचे बहुतेक सर्व अभंग श्रद्धायुक्त अंतःकरणांतून, उफाळून आलेल्या भक्तिभावनेनें ओथंबलेले आहेत.

विंदा करंदीकरांच्या किंवा अन्य कवींच्या काव्याची तुलना करण्याचा येथें हेतू नाहीं. परंतु ईश्वराविषयींची नितांत श्रद्धा अनेक रूपरंग तरंगातून या अभंगांत शब्दांकित झालेली आहे ही गोष्ट मला विशेषत्वानें सांगायची आहे. विसाव्या शतकांतील विज्ञान युगांत, समाजवाद साम्यवाद यासारख्या सामाजिक वादांचा वारा प्यालेले, किंवा सौंदर्यवाद अतिवास्तववाद, वा शून्यवाद यासारख्या वाङ्मयीन वादांचीं भूतें नाचविणारे कविब्रुव आजकालच्या मराठी कवितेंत थैमान घालीत आहेत. प्रणय शृंगाराच्या, यांत्रिक जीवनाच्या, त्याच त्याच चाकोरींतल्या कविता इतक्या उदंड झाल्या आहेत कीं कांहीं मासिक संपादकांनीं उबग येऊन कविता छापणेंच बंद केलें. लंपट उत्तान व उघडया नागडया शृंगाराचीं वर्णनें हे एक टोंक तर कलाहीन, कुरुप, क्लिष्ट, प्रतिभापीडित, अर्थशून्य, कविता हें तिचें दुसरे टोंक. कवितेला अर्थ नसतोच. Poem doesn't mean. It is or it feels या सारख्या शब्दांनीं आपल्या शब्दजंबाळ पाथरवटीचे कवी समर्थन सुद्धा करतात. हें सारेंच सांप्रदायिक कौतुकाचा अविभाज्य भाग आहे.

या पार्श्वभूमीवर, 'विठूचे वेड' जोपासणारी हळव्या भक्तिभावनेला अंतरंगांतल्या आवेगपूर्ण उद्रेकांतून वाट करून देणारी केच्यांची कविता अत्यंत स्पृहणीय आहे. आत्मलक्ष्यी व्यक्तिमन, सामाजिक जाणीव, ईश्वरावरील श्रद्धा, कलावंताची कलानिर्मितीसाठी धडपड, आसमंतांतील वस्तुजाताविषयी आणि प्राणिमात्राविषयींची कविमनाची ओढ, वगैरे कित्येक गोष्टी या कवितेंत अतिशय प्रभावीपणें प्रतिबिंबित झालेल्या आहेत.

केच्यांच्या कवितेंतील अनेक अवतरणें उद्धृत करण्याचा मोह आतां-




### आसवांचा ठेवा • निळाई

■ ■ ■ ■ ■ ■ ■ ■ ■ ■ ■

पर्यंत निग्रहानें टाळला. परन्तु अखेरीस 'शून्याचें उधाण' मापण्याच्या या कवीच्या सामर्थ्याची मेख पीडितांच्या 'आसवांच्या ठेव्यांत' आहे केवळ सूचित करण्यासाठी एक दोन उदाहरणें नमूद करतो.

'दाषाण' या कवितेंत आपली ईश्वरविषयक ओढ या देहानें व्यक्त होऊं शकत नाही हें सांगतांना ते म्हणतात—

जग फोडणारी गोडी
चाखण्यास चव
देहापल्याडचा हवा
नवा अवयव.

आस्तिक नास्तिक वादांच्या मेंडोळ्यांत क्षणकाल जरी नास्तिकता बरी वाटली तरी तीहि तात्पुरतीच ! म्हणूनच – खोट्यावरी पण

साधेनाच सूड
चावीक आखूड गीतेपरी !

या शब्दांत मधुकर केच्यांनी नास्तिकतेचा दुबळेपणा स्पष्ट केला आहे.

या कवितेंत येणाऱ्या प्रतिभा केवळ शब्दघोळ घालणाऱ्या नाहींत. तहानेली स्वप्ने, 'अंधार वाहतो उजेडाच्या काठीं' गुलाबाच्या फळांसाठीं अंकुरे डहाळी. यासारख्या कित्येक सौंदर्यपूर्ण आणि अर्थवाही प्रतिमांनी केच्यांची कविता सुगंधीत झाली आहे.

म्हणून 'आसवांचा ठेवा' हा काव्यसंग्रह केच्यांच्या आगामी काव्यशक्तिच्या नव्या सृजनाचा, गर्भातील हुंकार आहे असे म्हणावेसे वाटते.

[**आसवांचा ठेवा—ले. मधुकर केचे**. महाराष्ट्र प्रकाशन अमरावती मूल्य ३ रुपये]

**—श्रीपाद भागवत**

## सामाजिक पार्श्वभूमीवरील कलात्मक आविष्कार

**इन्दु** साक्रीकरांच्या मृत्युनंतर त्यांच्या सोळा कथांचा संग्रह 'निळाई' प्रसिद्ध झाला. या सोळा कथा त्यांच्या कथेचीं सगळी वैशिष्टचें स्पष्ट करतात. स्त्रीजीवनांतील सुखदुःखाचे (बव्हंशीं दुःखाचें) दर्शन विभिन्न पातळ्यांवरून या कथांत होतें. समाजकार्य करणाऱ्या लेखिकेच्या कथांत प्रकर्षानें जाणवणारे वाङ्मयीन गुण सांपडतात. त्यांची कथा प्रचारकथेपेक्षा वेगळें कांहीं तरी देऊन जाते. या कथासंग्रहांतील कांही कथा सामाजिक पार्श्वभूमि—सामाजिक विषमतेवर आधारलेल्या आहेत. तर कांहीं कथा मानवी मनाच्या अशा एका कोपऱ्याला स्पर्श करतात कीं तो सामान्य माणसाला अज्ञात असतो. सफाईदार रचना व आटोपशीरपणा हें आणखी एक वैशिष्टच.

'निळाई'मधील बहुतेक सर्व कथा स्त्रीजीवनाशीं निगडित आहेत.



अनुक्रमणिका





उलट 'बुवा', 'चेहरा', 'काजव्याच्या ज्योती' या पुरुष व्यक्तिरेखांना प्राधान्य दिलेल्या कथा. इतरांच्या व्यंगावर-त्यांच्या कौटुंबिक जीवनावर कोरडे ओढणारे नानवा ('चेहरा' कथेचा नायक) आपला संसार बापूच चालवितो हें विसरतात. बापूच्या व आपल्या पत्नीच्या संबंधांतील आक्षेपार्ह सलगी समजूतदारपणें विसरतात. 'काजव्याच्या ज्योती' या कथेंत भरल्या संसारांत एकाकी असणारे भाऊ व आनंदानें रमणाऱ्या माई यांच्यांतील संघर्ष चित्रित केला आहे. 'बुवा' ही एका गायन शिक्षकाची व्यक्तिरेखा. या तिन्ही पुरुषप्रधान कथांत जास्त आकर्षक ठरते ती 'चेहरा' ही कथा होय.

इन्दु साक्रीकरांच्या कथांना सामाजिक पार्श्वभूमि आहे. अशी सामाजिक पार्श्वभूमि असणारी कथा कांहीं वेळां फसण्याची-त्रोटक होण्याची शक्यता असते. 'निळाई' मधील कथा याला अपवाद ठरतात कारण कथालेखिकेचे-कलावंताचे मन सतत जागरुक असते. सामाजिक आशय व्यक्त करतांना कथेचा तोल ते बिघडूं देत नाहीं. मात्र 'घरसुद्धां एक रिक्षाच' किंवा 'एक संध्याकाळ' या दोन कथा हा तोल बिघडवितांना दिसतात. कथेंतील सामाजिक आशय कलात्मकतेला मारक ठरतो. या उलट 'तो क्षण' ही छोटीशी कथा जास्त सरस वाटते. तिच्यांतील सामाजिक आशय कथेचा अंगभूत भाग बनतो.

स्त्रीजीवनांतील कथांना साक्रीकरांच्या कथेंत वरचें स्थान आहे. 'सई' ही एका कुरुप मुलीची शोकांतिका. 'सई' मरते ती सुद्धा सर्वस्व देणाऱ्या 'रंगा' विषयी सहानुभूति ठेवून ! आपला नवरा दुसऱ्या एका स्त्रीबरोबर संसार करतोय. त्याच्याशी आपण एवढे दिवस विवाहित स्त्रीसारखे वागत आलो ही केवळ आपली फसवणूक चालली होती हें सुमतीबाईना समजून येतांच त्यांच्या मनांतील मोरपिसें गळून पडतात. याशिवाय 'पारोशी' 'कृपण' या दोन उल्लेखनीय कथा म्हणून सांगता येतील. साक्रीकरांची कथा केवळ स्त्रीजीवनांतील दुःखेंच प्रकट करतें असें नव्हे तर त्याहिपेक्षां अधिक कांहीं तरी देऊन जाते. कथा कांहीं मानवी मनाला अधिक खोलवर स्पर्श करतात. अज्ञात मनोव्यापारावर प्रकाश टाकतात. 'पूर्ती' कथेंतील नायिका जानकी विवाहानंतर पतीसौख्य न मिळाल्यामुळें त्याच्यापासून दूर राहून शिक्षिकेचा पेशा स्वीकारते. शरद रेगे अचानक तिच्या जीवनांत येतो. तिच्या अतृप्त इच्छेची पूर्ति केवळ एकाच प्रसंगांत होते. आयुष्यभर ती त्या प्रसंगाची हळुवारपणें जोपासना करते. पण त्या मोहपाशांत पडलेल्या तरुणाचे जीवन उध्वस्त होऊं नये म्हणून सोलापूर सोडते व मुंबईस येते. उतार वयांत पश्चाताप पावलेल्या जानकीचा नवरा प्रेमाची याचना करीत तिच्याकडे येतो. त्यावेळीं आपली जतन करून ठेवलेली अपूर्व प्रेमसृष्टि उध्वस्त केली जाणार ही कल्पना जानकीला सहन होत नाहीं. 'अगतिक' या कथेचा नायक एक डॉक्टर आहे. आपल्या प्रेयसीनें लग्न करूं नये असें वाटणारा हा डॉक्टर तिच्या विवाहाची बातमी कानांवर येतांच अस्वस्थ होतो. तो स्वतः विवाहित असूनहि ही विचित्र कल्पना त्याच्या मनांत सतत वावरतांना दिसतें हे या व्यक्तिरेखेचें मोठें वैशिष्टय.

'निळाई' ही अगदी छोटी कथा एक काव्यात्म अनुभव व्यक्त करते तो सुद्धां कारुण्य सोबत घेऊन. या कथेंतील सफाई व आटोपशीरपणा इतर कथांतूनहि अनुभवास येतो. 'निळाई' हे कथासंग्रहाचें नांव एकतऱ्हेचे काव्यात्मकतेचे, हळवेपणाचे वलय निर्माण करीत असले तरी या संग्रहांतील साक्रीकरांच्या कथा सामाजिक पार्श्वभूमि असलेल्या विशिष्ट कलात्मक पातळी गांठणाऱ्या कथा आहेत असेंच म्हटलें पाहिजे.

[**'निळाई'** (कथासंग्रह) कै. इंदु साक्रीकर सरस्वती प्रकाशन ४१४, सदाशिवपेठ पुणें २. मूल्य रु. ३–५०]

**प्रा. वि. शं. चौघुले**

## साभार पोंच

**पोत**
लेखक : द. ग. गोडसे.
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य– ८ रुपये.

**दोन ध्रुवांवर दोघे आपण**
लेखक : वसंत कानेटकर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य– २–५० न. पै.

**भरतमुनीचें नाटयशास्त्र**
लेखिका : गोदावरी केतकर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य : १५ रुपये.

**हेंनरिक इब्सेन**
लेखक : सदानंद रेगे
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य १० रुपये.

**मैत्रिण**
लेखक : प्रभाकर पाध्ये
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य ३ रुपये.

**सशाचे कान**
कवी : विंदा करंदीकर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य : १ रु. ५० पै.

**चंद्र सावली कोरतो**
लेखक : सदानंद रेगे
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य : ६ रुपये.

**कडू आणि गोड**
लेखक : गंगाधर गाडगीळ
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य : ७ रु. ५० पै.

**इंसाइड–प्रेझेंट–डे–चायना**
लेखक : नादादुर श्रीनिवासन
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
मूल्य १ रुपया.

**सुलभ नाटय शिक्षण**
लेखक : डॉ. बं. अ. वरवे
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय
मूल्य ५ रुपये.

**उधाण, ओहोट, भरती**
कवी : द. गो. कुळकर्णी
प्रकाशक– सौ. इंदिरा दत्तात्रय कुळकर्णी
गोवर्धनदास बिल्डिंग, गिरगांव, मुंबई ४.
मूल्य १ रु. ५० पै.

**ऊन**
लेखक : शंकर पाटील
मौज प्रकाशन गृह
मूल्य ५ रु.




नव्या फॉर्म्युलाचा

# सनलाइट

## अधिक चमकदार धुलाईसाठीं

नव्या फॉर्म्युलाच्या सनलाइटचें वेष्टन नवें आधुनिक असून त्याचा आकारहि नवा आकर्षक आहे. विशेष म्हणजे त्याची अधिक चमकदार धुलाईची शक्ति. या त्याच्या शक्तीमुळें प्रत्येक धुलाईला कपडे अधिक चमकदार धुवून निघतात — **अगदीं अधिक शुभ्र, अधिक चमकदार!**

S. 52-140 MA

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन



अनुक्रमणिका











# सन्मान पुष्पें

## मूर्तिमंत समर्पण

"एस्. एम्." म्हटलं कीं, एक तेजस्वी डोळयांची, कृश अंगाची, भव्य कपाळाची, सरळ नासिकेची आणि मूर्तिमंत सौजन्याची एक मूर्ति डोळयांपुढें येऊन उभी राहते. "एस्. एम्" म्हटलं कीं, एक विशिष्ट जीवनक्रम डोळयांपुढें येऊन उभा राहतो–एक ध्येयवादी व्यक्तित्व समोर येतं–एक भावनाशील, सेवापरायण, त्यागी जीवनाचा आलेख पुढें येऊन उभा राहतो. कांहीं कांहीं माणसें आणि त्यांचें जीवन मुळीं "वैयक्तिक" नसतेंच ! 'सामाजिक' जीवनाचा त्या त्या काळाचा, त्याच्या हर्षामर्षांचा जणुं तो चालता बोलता इतिहासच असतो. ह्या देशाच्या स्वातंत्र्याच्या चळवळीनें अशी कितीतरी 'सामाजिक' 'राजकीय' माणसें घडविलीं आहेत. त्यांना 'जीवन' दिलें आहे. 'तेजस्विता' दिली आहे. नवें 'मूल्य' दिलें आहे. नवा 'अर्थ' दिला आहे. आणि त्यांच्या कर्तृत्वाचें सुवर्ण उजळून टाकलें आहे. त्यांतलें कांहीं सैनिक राहिले आणि कांहींना 'सेनापति' होण्याचें भाग्य लाभलें. सैनिकांचीं नांवें इतिहासांत नोंदविलीं गेलीं तर क्वचित प्रसंगीं तीं अस्तंगतही झालीं (आणि तें अपरिहार्यही असते)–एस्. एम् जोशी हें नांव मात्र भारताच्या व विशेषत: महाराष्ट्राच्या राजकीय इतिहासांतून पुसून टाकतां येणार नाहीं. 'एस्. एम्.' हें नांव केवळ समाजवादी चळवळीशीं संलग्न नाहीं. तर महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाशीं निगडित असलेल्या प्रत्येक घटनेशीं तें नांव निगडित झालें आहे. कांग्रेस समाजवादी पक्षापासून तो संयुक्त समाजवादी पक्षापर्यंतचा त्यांच्या राजकीय जीवनाचा जो प्रवास झाला आहे त्यांतील सर्वच घटनांशीं सर्वजण सहमत होतीलच असें नाहीं. परंतु 'एस्. एम्'च्या जीवन निष्ठेबद्दल, प्रामाणिकपणाबद्दल, त्यागाबद्दल, समर्पणवृत्तीबद्दल कधींच दुमत नव्हतें. त्यांच्या ह्या सर्व अवस्थांत त्यांची 'समाजवादी निष्ठा' ही अभंग राहिली. आणि त्यांचें सौजन्य, अजातशत्रुत्वही अभंग राहिलें, कारण 'एस्. एम्' जोशींचा पिंडच मुळीं खऱ्या समाजसेवकाचा आहे. उदंड प्रीति हा त्याचा स्थायीभाव असतो. गेंडयाची पाठ हें त्याचें बलस्थान असतें. अनेक आघातांतूनही जोशींची निष्ठा ढळली नाहीं. विशेषत: संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचे वेळीं त्यांच्या नेतृत्वाची कसोटी लागली. विविध जीवननिष्ठांचीं माणसें 'समिती' ह्या नांवाखालीं एका विशिष्ट कार्यासाठीं एकत्र आलीं होतीं. कार्यसिद्धी होईपर्यंत ती मोट कायम राखणें भाग होतें. सत्याग्रह, गोळीबार, मृत्यु, धरपकड, अश्रुधूर या सर्व अवस्थांतून तें आंदोलन गेलें. जोशी त्या चळवळींत टिकले व यशस्वी झाले वृत्तीनें तें 'कडवे' असले तरी 'कटु' नाहींत. त्यामुळेंच स्वातंत्र्यवी[र] सावरकरांच्या मृत्युंजय दिनीं पुण्यांतल्या विराट सभेंत पहि[ले] गौरवपूर्ण भाषण त्यांनीं केलें. गुणग्राहकता त्यांच्याजवळ आहे सेवापरायणता आहे. त्याग आहे. समरसून कार्य करण्याची वृत्त[ी] आहे. त्यांचें व्यक्तित्व झंझावाती वा घणाघाती नाहीं. त्यांचें वक्तृत्व[ह] शांत, संथ असें आहे. त्यांनीं सेवेचें वाण टाकून कधीं पळ काढल[ा] नाहीं वा हिंशेबी 'इमले' ही उभारले नाहींत. त्यामुळेंच ते सत[त] 'जनतेचे' राहिले आहेत. त्यांच्या एकसष्ठी सत्काराच्या पत्रकां[व] फार मोठ्या व विविध थरांतल्या व पक्षांतल्या व्यक्तींच्या स्वाक्ष[री] आहेत ही एकच गोष्ट त्यांच्या अजातशत्रुत्वाची निदर्शक आ[हे] प्रतिकूलतेंतूनहि जीवननिष्ठा जपणाऱ्या 'एस्. एम्'ना आम्ही दीर्घायुरारोग्य चिंतितों.

## "उपासक" नारायण हरि आपटे

**साहित्यिक** आणि तोही प्रसिद्धि विन्मुख ही फार क्वचित ए[क] येणारी गोष्ट आहे. सर्वसामान्यपणें लिहिण्यापूर्वीं आणि लिहि[ल्या] नंतरही स्वत:च्या वाङ्मयासंबंधीं अनाहूतपणें बोलणारीं माण[सें] ह्या क्षेत्रांत अधिक सांपडतील. त्यामुळें असा दुर्मिळ संगम एख[ाद्या] व्यक्तीच्या ठिकाणीं झालेला दिसला म्हणजे मस्तक नम्र ह[ोतें] कुतुहल वाटते. कौतुकहि वाटते. नारायण हरि आपटे ह्यांनीं आप[ल्या] आयुष्याची नुकतीच पंचाहत्तरी ओलांडली–त्यानिमित्त त्यां[च्या] साहित्यसेवेचा मुंबईत सत्कार करण्यांत आला. मुंबईतला त्य[ांचा] हा पहिलाच प्रकट सत्कार असावा अशी माझी कल्पना [आहे] कारण सभा संमेलनें, वादविवाद–चर्चा, उत्तरें-प्रत्युत्तरें ह्या ग[ोष्टी] नानासाहेबांच्या प्रकृतीला मानवणाऱ्या नाहींत. अलिकडे पुस्त[क] प्रकाशन समारंभ, त्यांत त्या लेखकाचा सत्कार, त्याचें आत्मनि[वेदन] व कांहीं 'अहोरूपम्' पद्धतीचीं भाषणें (हें करावेंच लागतें–व हीहि एक देवाण घेवाणच असते) हे सारें ठरून गेलें नारायण हरि आपटे ह्यांची वाङ्मय सेवा जवळजवळ साठ व[र्षांची] आहे आणि त्यांनीं लिहिलेल्या पुस्तकांची संख्याही साठ

ण असे समारंभ त्यांना कवीं मानवलें नाहींत. साहित्य ही उपासना ानून एकांतांत ती साधकाच्या भूमिकेवरून करीत राहणें हें त्यांनीं ्तंव्य मानलें. कै. हरिभाऊ आपटे यांच्या प्रेरणेनेंच ते कादंबरी ेत्रांत उतरले. आणि १९०९ सालापासून आजतागायत ती श्रद्धा– ारणा त्यांनीं जोपासली आहे. (अजिंक्य तारा ही त्यांची पहिली ्तिहासिक कादंबरी १९०९ मध्यें प्रसिद्ध झाली). शिक्षण (लौकिके ् साहित्यविषयक श्रद्धेच्या–निर्मितीच्या आड येत नाहीं ह्याची मराठींत अनेक उदाहरणें देतां येतील. ना. ह. आपटे हें त्यांतीलच एक उदाहरण ) चार पांच इयत्ता मराठी आणि दोन इयत्ता इंग्रजी येवढेंच शिक्षण त्यांना लाभलें. वयाच्या पंधराव्या वर्षी गृहत्याग करून देशभक्तीसाठीं नारायण हरि उत्तरेस गेले. खूप भटकले आणि मग कोरेगांवांत स्थायिक झाले. लेखन हेंच ध्येय आणि जीविकेचें साधन केलें. हेतुपूर्वकता हा त्यांच्या साहित्याचा आत्मा आहे. समाज–देशहित ह्यांतून साधेल काय ? असा जणुं प्रश्न विचारूनच त्यांनीं लेखणी हातीं घेतली आणि अजिंक्य तारा, लांछित चंद्रमा सारख्या ऐतिहासिक व भाग्यश्री, आम्ही दोघें, साजणी, सुखाचा मूलमंत्र यासारख्या सामाजिक कादंबऱ्या मराठीला दिल्या. कुंकु, उमज पडेल तर सारखे यशस्वी चित्रपट त्यांच्या लेखणीनें मराठीला दिले आहेत. त्यांच्या ह्या साहित्योपासनेंत कलेचा भाग कदाचित कमीजास्त असेलही पण कौटुंबिक, उत्कट, हृद्य चित्रण करणारा एक लेखक म्हणून त्यांनीं लोकप्रियता मिळविली.

आज अक्षरशः एकाकी जीवन ते जगताहेत. मुली सासरीं गेल्या आहेत. पत्नी नुकतीच देवाघरीं गेली आहे. मराठी शारदेची शांतपणें, एकाकीपणें, प्रसिद्धीचा अभिलाष न धरतां उपासना करणाऱ्या नारायण हरि आपटयांना ह्या उपासनेसाठींच उदंड आयुष्य लाभो हीच आमची इच्छा. ●●

## जनार्दन शिंके :

'**प्रदीप**'कार जनार्दन शिंके यांचा परवा गोमंतकीय जनतेनें दहा हजार रुपयांची थैली देऊन मोठा गौरव केला. हा गौरव मोठा उचित होता व गोमंतकांतील जनतेकडे कृतज्ञतेचा केवढा मोठा भावपूर्ण सांठा अंतरांत सांठविलेला असतो, हे उत्कटतेनें दाख-विणारा होता. जनार्दन शिंक्रेंचा 'प्रदीप' आता मुक्त गोमंतकांत दर आठवडयाला एक टांकी व एक हाती निघतो हें खरेंच; आजही ते 'प्रदीप'मधून महाराष्ट्रवादी धोरणाचा हिरीरीनें प्रचार करतात हेंही त्यांच्या प्रखर तत्त्वनिष्ठेचें द्योतक आहे; आजही त्यांच्या लेखणीला तीच धार आहे व वाणीला तोच आधार आहे कीं जो गोमंतक मुक्तीसाठीं त्यांनीं 'दीपगृह' काढून तें अखंड व एकाकी चालवितांना त्यांना गोवा सरहद्दीवरच्या एका गांवांतील स्मशान-वटींतील भुतांनीं (?) व सापांनीं पछाडलेल्या घरांत मिळालेला होता. तो आधार म्हणजे त्यांचें त्यांच्या 'गोमंतका'वरील अलोट प्रेम; गोमंतकीय स्वातंत्र्याची त्यांना लागलेली ओढ व त्यासाठीं सर्वस्व पणाला लावून त्यांनीं केलेला त्याग, पत्करलेला वनवास व आपल्या एकनिष्ठ साथीदारांना बरोबर घेऊन चालविलेला गोवामुक्तीचा संग्राम. तशी वर वर उघडपणें सौम्यशी वाटणारी, कांहींशी किरकोळ व कलावंती नाजूकपणा धारण करणारी त्यांची मूर्ति, 'मूर्ति छोटी पण कीर्ति मोठी' अशा स्वरूपांत सात-आठ वर्ष गोवा सरहद्दीवर लक्करकोटपासून अवघ्या कांहीं अंतरावर निवास करून होती व स्वातंत्र्य रणयज्ञ चालवीत होती. सरहद्दीवर त्यावेळीं '**शिक्रे – रिबेलो**' या जोडीची नांवें सर्वांच्या मुखीं घोळत होती व अक्षरशः माणसें जिथें दिवसा जायला भीत असत त्या स्थळीं व त्या घरीं हे दोन नेते आपल्या कित्येक स्वातंत्र्य सैनिकांसह रात्रं-दिवस भुताखेतासारखे कसे वावरतात याचें आश्चर्य करीत असत. लक्करकोटहून १९५४ सालीं पहिली सत्याग्रही तुकडी **मार्क फर्नाण्डिसच्या** नेतृत्वाखाली प्रथम गोव्यांत गेली. तेव्हां व नंतरही एक अंगरखा-अंगांत घालणारी, खाली पायजमा, गोरी रेखीव, नाजूक व मोहक दिसणाऱ्या भालप्रदेशावर केसाची झुलपे कांहींशी पुढे पुढे करीत आहेत, अशी शिंक्रेची स्वतः मात्र पुढे पुढे न करता, मागून पुढारीपण अचूक करणारी मूर्ति अनेकांनी पाहिली होती. "होच मरे तो शिक्रो...?" असं विचारलं जाई. '**शिक्रे रिबेलो**'च्या '**क्विट गोवा**' (Quit Goa) चं कार्यालय सरहद्दीवर होतं. 'क्विट गोवा'-तर्फे त्यावेळीं चार भाषांमध्यें '**ज्वाला**' हें त्यांचं मुखपत्र निघत असे : पोर्तुगीज, इंग्रजी, कोंकणी व मराठी भाषेंत त्याच्या आवृत्या निघत. लेखन शिंक्रे करीत. चित्रें रिबेलोची असत. ह्याच्या प्रति 'हेराल्डो'मधून प्रत्यक्ष पोर्तुगीज अधिकाऱ्यांच्या हातीं पडत व मग त्यांचा जो कांहीं तिळपापड होई, (Quit Goa) 'गोवा छोडो' संघटनेला उखडून काढण्यासाठीं त्यांच्याकडून जे डावपेंच लढविले जात असत, व तरीहि बेडरपणें व प्रसिद्धि पराङ्मुखतेनें 'छोडो गोवा'चं कार्य वाढत्या जोमाने चालूच राही, तें गोवामुक्तीच्या इतिहासांतील तेजस्वी पर्व शिंक्रे यांनीच कधींतरी लिहून अनभिज्ञांसाठीं प्रसिद्ध केलें पाहिजे. त्यावेळीं त्यांनीं कांहीं पुस्तिका चारी भाषांतून प्रसिद्ध केल्या होत्या. विशेषतः Quit Goa ही पुस्तिका आजही पहाण्या-सारखी आहे. गिल्बर्ट रिबेलोची व्यंगचित्रें व शिंक्रेंचं त्यावरील भाष्य, अशी ही पुस्तिका पोर्तुगीजांना धडक भरविण्यास त्यावेळीं पुरेशी ठरली होती. सालाझारपासून तो सरहद्दीवर हुकुमशहा म्हणून अनीतीनें वावरणाऱ्या सरकारी पोलिस अधिकाऱ्यांवर या पुस्तिकेंतून जो हल्ला चढविण्यांत आला होता, त्याला तोड नाहीं. १९५९ सालीं लक्करकोटला जो अखिल भारतीय स्वरूपाचा सत्या-ग्रह झाला व पोर्तुगीजांच्या निर्दय गोळीबारांत **कर्नाल सिंह, राजाभाऊ महांकाळ, मधुकर चौधरी** सारखे हुतात्मे कामाला आले, आणि तत्पूर्वी तीन ऑगस्टला **नित्यानंद सहा** व **बाबुराव थोरात** यांचे लक्करकोटवर बलिदान झाले होते, त्या प्रसंगानंतर जनार्दन शिक्रेंनी '**तेथे कर माझे जुळती**' ही पुस्तिका स्वतः लिहून (मुख-पृष्ठावरील करुण उदात्त चित्र **गिल्बर्ट रिबेलोचं**...) प्रसिद्ध केली होती. या पुस्तिकेंत जनार्दन शिक्रयांच्या लेखणीचे सर्व श्रेष्ठ गुण प्रकट झाले आहेत. त्वेष, आवेश, आवेग, क्रोध व करुणा व

(पान ५६ वर पहा)






# कै. मामासाहेब वरेरकर



## (महाराष्ट्राचे ॲरिस्टोफेनिस)

**भार्गवराव** विठ्ठल ऊर्फ मामासाहेब वरेरकर यांचें देहावसान होऊन कित्येक दिवस लोटले आहेत. पण मामा आमच्यांतून कायमचे निघून गेले आहेत हें आजही मनाला पटवून द्यावे लागते. गेली चाळीसपन्नास वर्षे मामांचें नांव मराठी वाङमयांत व महाराष्ट्रांत सारखे गाजत होते. त्यांच्याबद्दल इतरांकडून खूप लिहीले गेले व त्यांनीहि स्वतःबद्दल कांहीं कमी लिहीलें नाही. अनेक वादळेही त्यांच्या भोंवती उठली व त्यापैकीं कांहीं त्यांनीं स्वतः उठविली. मामांचा पिंड हा ज्या भूमींत ते जन्मले तिच्यासारखाच अस्सल मालवणी होता; पण मालवणी पाण्यासारखा मचूळपणा त्यांच्या जीवनांत नव्हता. बरेंचसें अतिखारट व अति तिखट असें कांहींतरी त्यांच्या स्वभावांत होते व त्यामुळेंच 'अति'पणाने त्यांचे जीवन भरलें होतें. या विशिष्ट स्वभावाने युक्त व उक्त असं त्यांचं खासगी जीवन होतं पण त्याचं वाङमयीन व सामाजिक जीवन मात्र या मर्यादा ओलांडून जाणारं असं पुरोगामी जीवननिष्ठ व राष्ट्रव्यापी व विश्वव्यापी असं होतं. जातिवंत लेखकाच्या व कलावंताच्या वाट्याला येणाऱ्या सर्व हालअपेष्टा व वनवास त्यांच्या वाट्याला आले होतें. मालवण, कुडाळ, सावंतवाडी येथें पोस्टांत कारकुनी करणारा हा 'पी. एम्.' केवळ आपल्या लेखणीच्या कर्तृत्वानें व साहित्यावरील दुर्दम्य निष्ठेनें आयुष्याची अखेरची वर्षे 'एम्. पी.' म्हणून सन्मानानें जगला. भारताच्या महान् पुरुषाचं — पंतप्रधान नेहरूंजींचं — अकृत्रिम व अनंत प्रेम तो मिळवूं शकला; एवढेंच नव्हें तर भारताच्या राजधानींतच अखेर त्यांनीं आपला देह ठेवला व मराठी लेखकाला आजवर कधींहि न मिळालेला अलौकिक सत्कार व सन्मान राष्ट्रपतींकडून प्राप्त करून घेऊं शकला. पद्मभूषण मामासाहेब वरेरकर हे आपल्या लेखनानें, नाटकांमुळें व स्पष्ट निर्भीड वक्तव्यामुळें अगोदरच महाराष्ट्रभाषाभूषण ठरले होते. एकदा पु. म. लाडांनी त्यांची तुलना ग्रीक नाटककार ॲरिस्टोफेनिस याशीं केली होती. आपल्या नाटकांतून त्यांनीं मराठी रंगभूमीवर नाट्यतंत्राच्या दृष्टीनें जशी क्रांति केली तशीच समस्याप्रधान नाटकें प्रथमच लिहून त्यांनीं लोकजागृति केली. वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी 'भूमिकन्या सीते'सारखे नाटक लिहून एक नवाच दृष्टिकोन त्यांनी जनतेसमोर ठेवला 'तर अपूर्व बंगाल'सारखे नाटक लिहून प्रांताच्या व भाषेच्या मर्यादा ओलांडून बंगाली स्त्रीच्या दुःखाला त्यांनीं बोलकं केलं. बंगालीतील शरद्‌बाबू, रवीन्द्र, तर त्यांनीं हृदय भरभरून मराठीला दिले. 'माडाचे पोर' सारखी त्यांची लघुकथा मराठींतील एक अमरकथा आहें तर 'विधवा कुमारी'सारख्या त्यांच्या कादंबऱ्या मराठी स्त्री मनाला जाग आणणाऱ्या व ढोंगी समाजाचं बिंग फोडणाऱ्या अशा बुद्धिनिष्ठ व ध्येयवादी आहेत. मामांच्या कोट्या, त्यांचे हास्यविनोद, त्यांनीं काढलेले ओरखडे व घेतलेले चिमटे, सोसलेला उपहास व काढलेल्या खस्ता, या सर्व दृष्टीनेच मामांचं जीवन रुचकर व बोचकर होतं. तरीसुद्धां ज्याच्या सर्व दोषासह एखाद्यावर प्रेम करावं, असंच मामांचं व्यक्तित्व होत. व तसा हृदयाचा व भावनेचा ओलावा त्यांच्याकडे होता. केवळ लेखणीवर जगणारा व तिच्यावर जगणे अशक्य झालें तरी लेखणीवरील आपली निष्ठा व श्रद्धा अखंड टिकवून ठेवणारा मामाएवढा मोठा लेखक मराठींत दुसरा क्वचितच झाला असेल. मामांच्या पश्चात् मामांच्या जीवनावर व त्यांच्या वाङमयावर यापुढें विपुल लिहीलें जाईल. ते जीवंत असतांनाच त्यांच्या वाङमयावर प्रबंध लिहून एका विदुषीनें डॉक्टरेट सारखी उच्च पदवी मिळविली सुद्धां; पण स्वतः मामा शेवटपर्यंत बिनपदवीधरच होते. ज्या भारत राष्ट्रानें 'पद्मभूषण'सारखा किताब देऊन मामांचा ऐंशीव्या वर्षी उचित मान राखला व स्वतःची शान पाळली, त्यांचं मामांना महाराष्ट्रांतील मुंबई, पुणें किंवा नागपूरसारख्या विद्यापीठांना त्यांच्या जीवनभरच्या ध्येयनिष्ठ व मानवनिष्ठ वाङमयसेवेचा गौरव श्रेष्ठ पदवी देऊन करता आला नाहीं; नव्हे तो त्यांनीं कटाक्षानें केला नाहीं. याचें शल्य पुरोगामी वृत्तीच्या जीवननिष्ठांना नेहमींच टोंचत राहील. पण त्यामुळें मामांच्या सन्मानांत कांहीं उणेपणा आला असे म्हणणें व्यर्थ आहे. उणेपणा आला व तो आतां कायमचाच टिकून राहीला असेल, तो उपरोक्त महान् सांस्कृतिक संस्थांच्या जीवनांतच. मालवणचा हा एक वेळचा मामुली 'सारस्वत' इतःपर 'महाराष्ट्र सारस्वतांत' चिरकाल अमर झाला आहे व जोंवर मराठी भाषा आहे तोंवर त्यांची स्मृति सतत उजळत राहील व नव्या दमाच्या नाटककारांना व लेखकांना जीवन जागृत करीत राहील यांत संदेह नाहीं. 'दीपावली'चे कै. मामांच्या स्मृतीला शतशत प्रणाम.

—संपादक








# यूकॅरिस्टिक कॉंग्रेस

**दिनांक** २८ नोव्हेंबर ते ७ डिसेंबर या कालावधींत मुंबई नगरीमध्यें 'युकॅरिस्टिक कॉंग्रेस' भरत आहे व या कॉंग्रेसच्या बऱ्या-वाईटपणाबद्दल बरीच बरी-वाईट चर्चा कित्येक आठवडे चालूं आहे व पुढेंही कित्येक आठवडे चालूं राहील असें दिसते. ख्रिश्चन धर्मीयांच्या कॅथॉलिक पंथीयांचा अखिल जागतिक स्वरूपाचा असा हा मेळावा भारतांत व विशेषतः मुंबई येथें भरत आहे. व या मेळाव्याला प्रत्यक्ष पोप रोमहून येणार आहेत. या घटनेमुळें कॅथॉलिक पंथाच्या ख्रिश्चन बांधवांना मनस्वी हर्ष होणें साहजिक आहे. भारतानें इतिहास कालापासून आजवर अशा अनेक परधर्मीय परिषदांचें स्वागत, आपली अस्मिता न सोडतां, मुक्तमनानें व मुक्त-हस्तानें केलें आहे. भारताच्या सर्वसमावेशक व समन्वयी तत्त्वज्ञानाचा त्यामुळें नेहमी गौरवच झाला आहे व (असलीच तर) इतरांची तात्त्विक क्षुद्रता व अट्टाहासी वृत्ति उघडी पडली आहे. आज या प्रसंगीं सुद्धां भारताकडून या युकॅरिस्टिक मेळाव्याचें स्वागत होत आहे. त्याचा अर्थ भारत एकाद्या संकुचित संप्रदायाचा पुरस्कर्ता आहे म्हणून नव्हे, तर उलट निधर्मी तत्त्वज्ञानाच्या एका शास्त्रीय व निरोगी दृष्टिकोनांतूनच, उघड उघडच विशिष्ट धर्ममतें व सांप्रदायिक प्रणाली कट्टरपणें मांडणाऱ्या एका परंपरा-निर्मात्यांचें स्वागत भारताकडून मोकळेपणानें होत आहे. कोटयवधि कॅथॉलिकांकडून देवपदीं आसनस्थ झालेला व क्वचितच आपल्या आसनापासून ढळणारा व पाखंडी लोकांच्या दृष्टीस पडणारा 'पोप' आज भारतांत येण्याचें मान्य करतो व चार दिवस बाहेर पडतो, ही घटना स्वागतार्ह अशीच आहे. संकुचितवाद सोडून असंख्य भारतीय कॅथॉलिक बांधवांच्या धर्मभावनांचा उचित आदर राखून, पोपच्या आगमनाचें स्वागत करतांना 'दीपावली'ला आनंद होत आहे. व म्हणूनच 'युकॅरिस्टिक कॉंग्रेस'-संबंधीं स्पष्टीकरणात्मक लिहिण्याचें आम्ही ठरविलें आहे.




'युकॅरिस्ट' (Eucharist) हा शब्द मूळ ग्रीक शब्द 'यूकॅरिस्टिआ' यापासून झाला आहे. त्याचा अर्थ आहे **'आभार मानणें'** (Thanks-giving.), म्हणूनच 'यूकॅरिस्ट' हा **'आभार मानणें'** या अर्थाचा धार्मिक शब्द बनला आहे. या शब्दाला ख्रिश्चनांच्या बोली पद्धतीप्रमाणें एक खास अर्थ प्राप्त झाला आहे. ख्रिश्चनांच्या पूजापद्धतीची मध्यवर्ती क्रिया दर्शविणारा म्हणून हा शब्द त्यांच्या वापरांत येतो. 'अखिल कॅथॉलिक अध्यात्म या **'यूकॅरिस्ट'** शब्दाभोंवतीं प्रदक्षिणा करते. ती एक धर्मक्रिया आहे जिला कॅथॉलिक लोक थोडक्यांत 'मास' (The Mass) म्हणून संबोधितात. तिच्यामुळें परमेश्वरापुढें कॅथॉलिकांकडून केल्या जाणाऱ्या दैनंदिन पूजाकर्मांत कॅथॉलिक सांप्रदायिकांचें ऐक्य साधलें जातें. येशू ख्रिस्तानें आत्मार्पण केल्यापासून ही क्रिया चालूं आहे आणि ही आत्मार्पणाची प्रक्रिया ख्रिस्ताशीं तादात्म्य साधून कॅथॉलिक लोक पुनः कृतींत आणतात.

ही कांहीं पहिलीच 'कॉंग्रेस' नव्हे. एक पहिली कॉंग्रेस इ. स. १८८१ मध्यें फ्रान्स-मधील **लिली** (Lille) येथें भरली होती. त्यानंतर **सवतीस** परिषदा भरल्या. प्रत्येक चार वर्षांनीं एक, अशा त्यानंतर परिषदा भरल्या. एक उत्तर आफ्रिकेंत कार्थेज येथें; पश्चिम जर्मनींत म्यूनिच येथें; अशा. आतां भरणारी ही परिषद आशियांतील पहिली परिषद नव्हे. 'मनिला' येथें पहिली परिषद (आशियांत) भरली होती. मात्र आशियाच्या या बाजूला मुंबईंत भरणारी ही पहिलीच परिषद आहे.

धर्मगुरु **सहावे पोप पॉल** यांनी या परिषदेला उपस्थित रहाण्याचा निर्णय घेतल्यावर असे उद्गार काढले आहेत: **"मी एक यात्रेकरू म्हणून येत आहे."** जे जे म्हणून सर्व प्रतिनिधि या परिषदेला येणार आहेत त्यांनीं याच भावनेनें यावें..... **यात्रेकरू** म्हणून यावे – हाच स्वच्छ दृष्टिकोन पोपसाहेबांच्या या उद्गारांतून व्यक्त झाला आहे. सर्वांनी सर्वांसाठीं अति उदात्त प्रेम द्यावें, ही येशू ख्रिस्ताची शिकवण या परिषदेच्या निमित्तानें सर्व प्रतिनिधींच्या हृदयांत खोल रुजावी व तिचें रूपांतर त्यांच्याकडून अधिकाधिक औदार्यांत व आपल्या शेजाऱ्यांना बंधुप्रेम देण्यांत व्हावें, हेंच उद्दिष्ट या 'कॉंग्रेस'समोर आहे.

"यूकॅरिस्ट आणि नवा मानव" असा एक विषय या परिषदेनें आपलें ध्येय म्हणून जाहीर केला आहे. आजच्या तंटेबखेडयांनीं भरलेल्या व जखमांमुळें रक्तबंबाळ झालेल्या जगांत क्रांतिकारक बदल होण्याची जरुरी आहे, असें या परिषदेचें म्हणणें आहे. त्या दृष्टीनें या परिषदेंत भाग घेणाऱ्यांना ही परिषद एक निरोगी प्रकृतीकडे नेणारा झरा दाखवूं इच्छिते. आजच्या आजारी जगाला जीवनदान देणारं अन्न देण्याचा तिचा इरादा आहे. एक अधिक चांगलें जग निर्माण करण्याचा तिचा मानस आहे. हें पुनर्निर्मितीचें कार्य आपण आपल्या हृदयांत प्रथम घडवून आणलें पाहिजे, अशी तिची धारणा आहे. **"स्वात्म तत्त्वाची पुनर्निर्मिती"** ही तिची हांक आहे; आणि परमेश्वरावर भरोसा ठेवूनच ती शक्य होणार आहे. नाहींतर निराशाजनक अपयश आपल्या वांटयाला येणार आहे. तिच्या दृष्टीनें येशूच्या 'पर्वतावरील प्रवचना'चा संदेश नीट समजून घेणें आज आवश्यक झालें आहे. महात्मा गांधीजींचा तोच संदेश होता. आजचें आपलें राष्ट्रीय धोरण सुद्धां 'सर्वांठायीं प्रेम साधून शांतीची' प्रस्थापना करूं पाहणारे आहे.



अनुक्रमणिका






हाच संदेश या परिषदेला द्यायचा आहे.

म्हणूनच हा संदेश प्रत्यक्ष कृतींत आणतां यावा व प्रतिनिधींची कसोटी पहावी म्हणून या कॉंग्रेस सप्ताहांत कांहीं खास वेळ सामाजिक सेवेसाठीं राखून ठेवण्यांत येणार आहे. इस्पितळें, अनाथाश्रम, झोपडपट्टी, वृद्धांसाठीं घरें, व तुरुंग यांना भेटी देण्यांत येणार आहेत, आणि शहरांतील व उपनगरांतील गरीब जनतेसमवेत सहभोजनाचा कार्यक्रम होणार आहे. सामाजिक धर्मादायावर त्यामुळें शिक्कामोर्तब होणार आहे.

प्राचीन चालीरितीप्रमाणें पोप रोममधून कधींच वाहेर पडत नाहीं. परंतु या परिषदेसाठीं हा अपवाद घडला आहे; त्याचें कारण ही परिषद म्हणजे अखिल विश्वाची एक " कौटुंविक वैठक " म्हणून भरणार आहे. अर्थातच या कुटुंबाचा ' पिता ' म्हणून पोपच्या उपस्थितीची निवड आहे. पोप हा कॅथॉलिक चर्चचा अध्यात्मिक प्रमुख आहे. परन्तु त्याचा अर्थ तो कॅथॉलिकांच्या सर्व ऐहिक जीवनाचा प्रमुख आहे असा नव्हे. तो फक्त धार्मिक नेता आहे. इतर वावतींत तो ढवळाढवळ करणार नाहीं. अशी ही भूमिका आहे.

# "मोंगल" राजवट आणि "लाल" राजवट

**माणसांनीं** सोयीनुसार व देशभक्तीनें प्रेरित होऊन निरनिराळीं नांवें घेतली तरी अखेर माणूस हा सर्वसाधारणपणें इथून तिथून एकच असतो. आणि म्हणूनच एका देशाच्या इतिहासापासून दुसऱ्या देशांना वोध घेतां येतो आणि त्याच त्या चुका वेगवेगळ्या वंशांच्या नांवानें पण माणसें करीत असतात. 'विकार' सारखे आणि विकारांचीं फलितेंही सारखींच! मोंगल वंशाच्या इतिहासांत असें दिसतें कीं, मुलानें वापाला कैदेंत टाकायचें, भावाला मारायचे (कधीं कधीं भावांनाही) नातेवाईकांना हांकलून द्यायचें व सत्ता कावीज करायची. सत्ता घेतल्यावर मागल्या राजा वा वादशहाचीं सारीं माणसें हद्दपार करायची व राज्य सुरू करायचें (पुन्हां दुसऱ्यानें तोच पाठ गिरवीपर्यंत). रशिया नामक देशांत एक मोठी राज्यक्रांति झाली. क्रांति घडविणाऱ्या नेत्यांपैकीं कांहींना क्रांति यशस्वी होतांच क्रांतीचे 'वळी' व्हावें लागलें. (मांजरी नाहीं कां आपलींच पिल्लें खात) क्रांति घडली. स्टॅलिनच्या हातीं सत्ता आली. त्यानें कांहीं काळ अधिराज्य गाजविलें. एक कणखर प्रभावी, पराक्रमी राष्ट्र रशियाला उभारून दिलें. दुसऱ्या महायुद्धांत अत्यंत धूर्तपणें व प्रभावीपणें राज्यशकट हांकला आणि विजयी सेनानी म्हणून कीर्ति मिळविली. पण स्टॅलिनच्या मृत्यूची जणुं वाट पाहणारांनीं स्टॅलिनचीं माणसें गारद केली. त्याचीं छायाचित्रें गेलीं. पुस्तकांतला "वेद" अस्तंगत झाला. रशियाला दीर्घकाळ योग्य मार्गदर्शन करणारे मॉलोटोव्हसारखे नेते हद्दपार झाले. वेरियासारखीं माणसें ठार झालीं आणि नवें नेतृत्व पुढें आलें. त्यांनाही भेटला एक महाठक! त्यानें त्यांना, त्यांनींच गिरविलेला धडा, शिकविला. आणि मग रशियांत अक्षरशः एक नवें वारें खेळूं लागलें. रशियांतली "पडदा" पद्धत नाहींशीं झाली. (निदान अंशतः तरी—कारण सारी नाहींशी झालीं असें आतां कसें म्हणावें?) येणें जाणें वाढलें. अंतरांळातही वाढलें. अमेरिकेसारख्या देशाला रशियाचा नेता भेट देऊन आला. त्यानें 'युनों'त भाषण केलें. हिंदुस्थानांत पाव्हण्यांची वर्दळ नेहमींच असते. तसें आपण आतिथ्यशील! मित्र म्हणून येणारांचेंही आम्ही स्वागत करतों आणि खिशांत खंजीर घेऊन पण चेहरे हंसरे ठेवून येणारांचेही स्वागत करतांना, आमचें मन उचंवळून येते. रशियन पाव्हण्यांचे त्यांच्या 'चिनी' भाईबंधांचे आम्हीं सारखेंच स्वागत केलें. रशियाला परत जातांच त्यांतला एक 'कटाप' झाला मग फक्त 'के' उरले. "ऑल् इन ऑल के". त्यांनीं रशियाला स्थिर राजसत्ता दिली. जगन्मित्र बनविले. भारताला मदत दिली. क्युवांत युद्ध टाळलें. अनेक अंतराळवीर रशियाला दिले. वैज्ञानिक प्रगति घडविली. तसें हें सारें वरें चाललें आहे असें वाटत हो.ें (आपल्याला) पण तिथें मात्र हें जें पिकत होतें त्याला वाजार मिळत नव्हता. (असें आतां म्हणायला हरकत नाहीं). त्यामुळें आपल्या दृष्टीनें मिस्टर 'के' यांनीं ज्या ज्या चांगल्या गोष्टी केल्या त्या त्या गोष्टी वाईट ठरल्या (तिकडे) आणि 'लाल' राजवटींत जें अपरिहार्य असतें तेंच पुन्हां घडलें. जगांत "लोकप्रिय" होणें ही कल्पना "लाल" राजवटींत पाप कल्पना मानली जात असली पाहिजे. चाऊ एन्. लायपेक्षां 'के' लोकप्रिय! मग 'लाल' सत्तेला तो शापच कीं! आतां 'के' घरीं वसले. त्यांना अर्धांगाचा झटका आल्याची वार्ता मध्यंतरी वृत्तपत्रांत येऊन गेली. त्यांना ज्या पद्धतीनें अर्धचंद्र मिळाला ती पद्धत हाच तर मुळीं 'लाल' राजवटीचा—क्रांतीचा वारसा आहे. ज्यांनीं तो दिला तीही त्या क्रांतीचींच वाळें आहेत. तेव्हां 'कें'च्या निर्वाणावद्दल खंत वाटत असली आणि ती साहजिकच असली तरीही त्यांत गळा काढून रडण्यासारखे कांहींही नाहीं. हा चालत आलेला वारसा आहे. आपण आपलें उगवत्या सूर्याचे उपासक होऊं या. झालं. (आणि आम्हीं नेमके हेंच केलें.) इंदिरा गांधी तडक मॉस्कोला गेल्या. दुसऱ्या 'के' ना भेटल्या. त्यांनीं "वत्सा, तुला अभय आहे. तुझ्या-वाटेला आम्ही कधींही जाणार नाहीं." असें आश्वासन दिल्यावर "दिल्ली" शांत झाली. आतां रशियाचे नवे नेते हे आमचे खरे व चांगले मित्र कसे आहेत हें पटवून घेण्याची व (देण्याची) कामगिरी आमचे शिरीं येऊन पडली आहे. हे चमत्कार आम्ही वारंवार पाहिले आहेत. (आणि तरीही आमच्या देशांतले लालभाई मात्र आम्हांला स्थिर सरकार देण्याची भाषा करतातच) आणि पाहण्याची आमची तयारीही आहे. कारण ह्या साक्षात्कारांतूनच आमची माणसावरची, माणसांतल्या विवेकशक्तीवरची, लोकशाहीवरची, आणि अनेक प्रमाद करूनही अंतीं यशस्वी ठरणाऱ्या जनशक्तीवरची श्रद्धा वाढण्यास मदत होणार आहे. तूर्त आम्ही सर्वांचेच मित्र आहोंत. कारण आम्हांला जगायचं आहे. मोठं व्हायचं आहे. लोकशाही विजयी झालेली पहायची आहे. कारण अखेर आमची माणसावर, त्याच्या साऱ्या "देवत्वा"वर श्रद्धा आहे. त्याचा विजय अटळ आहे. ★






# आणि एक "स्थिर" राजवट

**राज** मुकुटाला हिरे माणके लावलेली असलीं व तो सुवर्णाचा वनविलेला असला तरीही तो कांटेरीच असतो हें शतकामागून शतकें गेलीं तरी आतां गृहित सत्य झालें आहे. त्या मुकुटाला जोंपर्यंत राज्य करायचें आहे तोंपर्यंत साऱ्यांचें समाधान त्याला कधींच करतां येणार नाहीं. आणि म्हणूनच लोकशाही अधिकांचे (Majority ) समाधान ही कसोटी मानून राज्य हांकायला वसली असली पाहिजे. पण ह्या अधिकांचें समाधान पाहतांना कधीं कधीं दुखावलेले जे अल्पसंख्य असतात त्यांतला एखादा माथेफिरू उठतो आणि जास्तींत जास्त चांगलें करणारांच्या म्होरक्याला त्याच्या पिसाटपणाचें 'बळी' व्हावें लागतें. अमेरिकेसारख्या प्रगत देशांतही हें अधुनमधून घडत आलें आहे. अमेरिकेचे लोकप्रिय अध्यक्ष क्रांतिकारक अध्यक्ष, नवा विचार मांडणारे व तो विचार कार्यान्वित करणारे अध्यक्ष अशा माथेफिरू पिसाटांच्या शस्त्राला बळी पडले आहेत. सर जॉन केनेडी ह्यांचाही असाच बळी गेल्या वर्षीं घेतला गेला. आणि साऱ्या जगाला एक प्रचंड धक्का वसला. उपाध्यक्ष जॉन्सन ह्यांनीं अध्यक्ष होतांच केनेडी यांच्या ध्येय धोरणाचा पाठपुरावा केला. व समर्थपणें राज्यकारभार केला. त्यानंतर निवडणूक ही एक अपरिहार्य गोष्ट होती. निवडणुकी सर्वसाधारपणें नेहमींच गाजतात. लोकशाहींतली ती एक मोठी गंमतच असते. निवडणुकीचे आधीं व नंतर तीवर जीं भाष्यें होतात तीं तर फारच गंमतीदार असतात. मानवी बुद्धीची कसरत मोठी पाहण्यासारखी असते. अमेरिकन निवडणुकींत ही प्रचाराची जी धमाल उडाली होती ती पाहिली कीं, ह्याचा प्रत्यय येतो. सिनेटर बॅरी गोल्डवॉटर (रिपब्लिकन) यांनीं निवडणुकीसाठीं उमेदवारी जाहीर करतांना केनेडी व जॉन्सन ह्यांनीं स्वीकारलेल्या अंतर्गत व परराष्ट्रविषयक धोरणांना एक प्रकारचें आव्हानच दिलें होते. शांततामय सहजीवन आणि नीग्रो विषयींची केनेडी-जॉन्सन ह्यांची भूमिका ह्या दोन गोष्टींवर आघात करून आजच्या काळांत अधिक आक्रमक अशा नेतृत्वाची गरज असल्याचे गोल्डवॉटर यांचें मत होतें. त्यांच्या भाषणांतलीं कितीतरी वाक्यें इथें देण्याचा मोह होतो. पण तो टाळतो. कारण सूज्ञ अमेरिकनांनीं त्यांना त्यांचें योग्य स्थान आतां दाखविलें आहे. खुद्द रिपब्लिकन्सच्या वालेकिल्ल्यांतही जॉन्सन यांना अधिक मतें मिळाली आहेत. अध्यक्षीय मतांप्रमाणेंच अध्यक्षीय पक्षालाही अमेरिकन कॉंग्रेसमध्येंही निर्विवाद वहुमत मिळालें आहे. बहुमताला जेवढया जागा आवश्यक असतात त्यापेक्षां २१८ अधिक जागा डेमोक्रॅटस्ना मिळाल्या आहेत. जॉन केनेडी यांचे दोन बंधु—रॉवर्ट व एडवर्ड—हेही निवडून आले आहेत. उपाध्यक्ष म्हणून जॉन्सन पक्षीय उमेदवार ह्यूवर्ट हॅम्फ्रे हेही निवडून आले आहेत.

लिंडन बी. जॉन्सन ह्यांचा हा विजय साधासुधा विजय नाहीं. अटीतटीच्या सामन्यांतील तो विजय आहेच. पण गोल्डवॉटर यांजपेक्षां जॉन्सन ह्यांना दीड ते दोन कोटी मतें अधिक मिळाली असल्यानें मागील सर्व मतांचे उच्चांक ह्या निवडणुकीनें मोडले आहेत. अध्यक्ष जॉन्सन ह्यांनीं स्वीकारलेल्या शांत, संयमी व पुरोगामी धोरणालाच जणुं आपला अधिकृत पाठिंबा देऊन अमेरिकन जनतेनें त्यांना कै. केनेडींच्या धोरणाला चिकटून राहण्याचा आदेश दिला आहे. केनेडींच्या हत्येनंतर तें धोरणहि एक चर्चाविषय झालें होते. ती चर्चा जनतेनेंच बंद पाडली आहे. रशियांतील सत्तांतर, व चीननें अणुस्फोट केल्यानें आशिया-आफ्रिकेंतील बदललेली परिस्थिती यामुळें एकूण जागतिक राजकारणाला एक नवी कलाटणी मिळत आहे. अशा परिथितींत अमेरिकेसारख्या राष्ट्राला जॉन्सनसारख्या नेत्याचें नेतृत्व लाभत आहे ही जागतिक राजकारणाचे दृष्टीनें भाग्याची गोष्ट आहे. जॉन्सन ह्यांच्या विजयाचें नव्या रशियन नेत्यांनीही जें स्वागत केलें आहे तेंही बोलकें आहे. नव्या रशियन नेत्यांनीं इतर कम्युनिस्ट देशांबरोबरच चीनलाही आपल्या सूत्रांत गोंवण्याचा जो प्रयत्न चालविला आहे तो चांगला असला तरी कितपत यशस्वी होईल हें सांगणें आज कठीण आहे. पण त्यांत त्यांना यश आलें वा निदान चीनची युद्धखोरीची भूमिका बदलणें त्यांना शक्य झालें तरीही जॉन्सन व अन्य संयत नेतृत्वाचीं राष्ट्रें ह्यांनीं स्वीकारलेल्या शांततामय धोरणाचा तो विजय ठरेल. चीनच्या अणुस्फोटाच्या व रशियांतील सत्तांतराच्या पार्श्वभूमीवर जॉन्सन यांचा हा विजय अतिशय महत्वपूर्ण ठरणार आहे. त्यामुळें जॉन्सन ह्यांचा हा विजय ही एक केवळ अमेरिकेंतली सामान्य घटना नाहीं. तो एक जागतिक महत्वाचा विजय आहे.

# 'सत्य' नाकारणारे "सत्या" चे वाली

**मेनी** मेनी थँक्स टु एस्. के. पाटील ! थँक्स टु कामराज अँड थँक्स टु कॉंग्रेस ! ! गोव्यांत चैतन्य उत्पन्न केल्याबद्दल थँक्स ! महाराष्ट्राला सावध केल्याबद्दल थँक्स ! महाचव्हाणांना जागृत केल्याबद्दल थँक्स ! महाराष्ट्राला पुन्हां एकदां अन्यायाविरुद्ध एकोप्यानें उभे राहण्याची महान संधि प्राप्त करून दिल्याबद्दल थँक्स ! नुसत्या निवडणुकींच्या पराभवातलें 'सत्य' आम्हांला समजत नाहीं हे पाटील मुखानें कॉंग्रेसनें गोवेंकर जनतेला जाहीररीत्या सांगितलें त्याबद्दल थँक्स ! भोळी बिचारी जनता ! तिला वाटलं निवडणुकींत लोकमताचा कौल सर्वांत महत्वाचा ! मतपेटीवर ह्या देशांत राज्य चालते अशी भ्रामक व वेडगळ समजुत करून घेऊन तिनें निवडणुकीची संधि सांपडतांच मतें दिली. आपला कौल दिला. आणि कॉंग्रेस ह्या जागतिक कीर्तीच्या महान संघटनेला कीं हो धूळ चारली! महाराष्ट्रवादी गोमंतक संघटनेला मतें दिली व आपण प्रथम गोमंतकीय असलों तरी 'महाराष्ट्रवादी' गोमंतकीय आहोंत ही गोष्ट ठणठणीतपणें सांगितली. मोठया तोफा, पैसा, प्रतिष्ठा, कॉंग्रेसची पुण्याई तिथें भुईसपाट झाली. पण पराभव मान्य करायला सुद्धां दिल मोठा लागतो. अंतःकरण निर्मळ असावं लागतं. गोव्याचा कौल निर्विवाद होता व आहे. पण 'गोव्याची संस्कृति

'म… ाचा विकास' ह्या तुणतुण्यांचा आधार घेऊन 'सत्य' नाकारण्याचा करनखरेपणा चालूं झाला. एकात्मतेचा जप तोंडानें चालूं असतांनाच 'युनायटेड गोवन्स' ह्या सालाझारचा वारसा जपणाऱ्या व राष्ट्रीय एकात्मतेवरच घाव घालूं इच्छिणाऱ्या संघटनेशीं चुंबाचुंबी चालूं झाली आहे. अजूनही तीन सरकारनियुक्त प्रतिनिधींची नेमणूक नाहीं, नेहरूंच्या अस्थिकलशाबाबतची काकोडकरी कारवाई चालू शकते. आणि आतां पाटील मुखानें दहा वर्षें व सार्वमत हीं गुपितें बाहेर पडलीं आहेत. सार्वमताचा दावा तर इतका फुसका, हास्यास्पद व खुनशीपणाचा आहे कीं, हाच दावा मग काश्मीरला कां नाकारतां असा सवाल करावासा वाटतो. काश्मीरमध्यें जर निवडणुका हें, सार्वमत ठरत असेल तर तें गोव्यांत कां ठरूं नये? केवळ गोव्यानें रोखठोक पराभव केला म्हणून! त्याचा बदला म्हणून? कीं, गोव्यानें नावडत्या महाराष्ट्राच्या बाजूनें ठणठणीत कौल दिला म्हणून? सार्वमत घेऊन देशाची फाळणी केलीत? सार्वमत घेऊन बेरुबारीचें दान केलेंत? सार्वमत घेऊन महाराष्ट्र नाकारला होता? आणि परत दिलांत तेव्हां सार्वमत घेतलें होते? हैद्राबादच्या जनतेवर जेव्हां पोलिस अॅक्शन लादलींत तेव्हां निझामाविरुद्ध दिल्लीला काय आवतणें गेलीं होती? सार्वमताचें थोतांड हें केवळ हास्यास्पदच नव्हे तर अन्य ठिकाणीं राज्यकर्त्यांच्या अंगलट येणारें आहे. सत्य 'सत्य' म्हणून (कटु असलें तरी) स्वीकारण्याचें मोठें मन राज्यकर्त्यांनीं बाळगलें पाहिजे. केंद्रीय राज्यकर्त्यांनीं भारताचा व्यापक विचार करायला हवा. ते जर प्रांतीय 'पाटील'गिरींत सांपडलें तर त्यांची उंची त्यांनीं सोडली असेंच होईल. पंडित नेहरूंच्या हयातींत हा निर्णय घेण्यांत आला. त्या बैठकीला यशवंतरावजी चव्हाण हे उपस्थित नव्हते व कामराज, शास्त्री व पाटील यांनीं सल्लामसलत करून हा निर्णय घेतला असें आतां जाहीर झालें आहे. परंतु मुळांतच हा निर्णय घेतांना गोव्याची विधानसभा, गोव्याचे लोकनियुक्त मुख्यमंत्री व गोव्याच्या निवडकीचें सुत्रचालन करणारे चव्हाण ह्यांना कां विश्वासांत घेतलें गेलें नाहीं? गोव्यांतील जनता ही इथें प्रधान मानली जायला हवी आहे. महाराष्ट्राच्या जनतेला ठोकर दिल्यावर तिनें जो हिसका दाखविला होता ती घटना अजून फ़ार जुनी झाली नाहीं. गोव्याच्या जनतेनें शिकविलेलें 'सत्य' समजून घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न राज्यकर्त्यांनी केला पाहिजे. सत्याकडे डोळेझांक करून 'सत्यमेव जयते' असें म्हणतां येणार नाहीं. पण महाराष्ट्राचे 'बाबतींत' खुद्द महाराष्ट्र, बेळगांव, कारवार गोवा, ह्या साऱ्या प्रश्नांकडे पाहण्याचा एकूण दृष्टिकोन 'साफ' नाहीं हेंच वारंवार घडणाऱ्या ह्या घटनांमुळें म्हणावें लागतें. महाराष्ट्राचा निर्णय मंत्रिमंडळाचे बैठकींत घेतला जातो आणि त्याची माहिती चितामणराव देशमुख ह्यांना असत नाहीं. आणि गोव्याला दहा वर्षें केंद्रशासन कायम ठेवण्याची "अधिकृत" शिक्षा होते आणि त्याची कल्पनाही यशवंतरावांना असत नाहीं ह्या घटना आमच्या राज्यकर्त्यांच्या "लोकशाही" वृत्तीवर प्रकाश टाकतात. प्रश्न सोडविण्याऐवजीं प्रश्नांतून प्रश्न उत्पन्न करून त्यांतून घोळ उत्पन्न करणें व भावनिक कटुतेला वाव देणें हा खेळ गेलीं सोळा वर्षें आमचे राज्यकर्ते खेळत आहेत. हे घोळ अखेरीस किती महाग पडतांत हे काश्मीर प्रश्नावरून ध्यानांत येत नाहीं काय?

पण तरीही आम्ही पाटलांचें अभिनंदन करतों. कारण महाराष्ट्राला त्यांनींच नाक खाजवून अपशकुन केला होता. महाराष्ट्राची अस्मिता पेटविण्याचे कामीं तें त्यांचें 'सत्कृत्य' कारणीं आलें होतें. आज पुन्हां पाटलांनीं गोवा महाराष्ट्राच्या अस्मितेला हें आव्हानच केलें आहे.

इतिहासाची पुनरावृत्ति घडते म्हणतात— कदाचित् गोव्यांतही महाराष्ट्राचे महाभारत घडावें अशी काळाची मागणी असेल—

Truth shall prevail! Justice will survive!

**—सारस्वत**

---

(पान ५१ वरून)

काव्यमयता या भावांचं त्यांत पडलेलं प्रभावी प्रतिबिंब काळजाला पीळ पाडणारं फॅसिस्ट राजवटीचं नागडं उघडं राक्षसी स्वरूप तोडून फोडून टाकणारं असं होतं. त्यांनीं '**अनामिक महात्मे**' ही आणखी एक पुस्तिका लिहून अनेक अज्ञात स्वातंत्र्यवीरांचं जीवन गोमंतकीय स्वातंत्र्य सैनिकांना ज्ञात करून दिलं होतं. '**स्टीफन झ्वाईग**' हा त्यांचा आवडता ग्रंथकार. त्याचे सर्व ग्रंथ पोर्तुगीजमधून प्रसिद्ध झालेले त्यांच्याजवळ असायचे. आपल्या '**दीपगृहा**'च्या दिवाळी अंकांतून त्यानीं झ्वाईगच्या कादंबऱ्यांची भाषांतरें पण प्रसिद्ध केली होती व नंतर पुस्तक रूपानें प्रसिद्ध केली होती. तसं पाहिलं तर सुखासीन व मध्यम वर्गीय अशी ही बुद्धिजीवी असामी गोव्याच्या क्रांतियुद्धांत सहभागी झाली याचं नवल वाटतं. अखंड वाचन करीत रहावं, लेखणी झिजवावी, ललितरम्य कांहीं लिहावं, उच्चभ्रु रसिकतेनें प्रसन्न जीवन जगावं, अशा वर्गांत जन्मलेला हा गोमंतकाचा वर्तमानपत्रकार लेखक क्रांतिकारक, केवळ वर्गनिष्ठ न रहातां लोकनिष्ठ, व समाजनिष्ठ, क्रांतिनिष्ठ व विश्वनिष्ठ बनावा अशाच कांहीं रसायनांनीं बनलेला जनार्दन शिक्रेंचा मूळ पिंड आहे. आजही गोव्याच्या राजकारणांत ते अग्रभागी कदाचित नसले तरी माग्रभागीं आहेत. पोर्तुगीज साम्राज्यवाद्यांना जो इंगा त्यांच्या लेखणीने दाखविला तोच इंगळा त्यांच्या 'प्रदीप'मधून पेटवून ते गोव्यांतील संधिसाधू प्रतिगामी राजकारणी घेंडांना त्याचा चटका दिल्यावांचून राहणार नाहींत. उद्यां गोव्याचे महाराष्ट्रांत विलीनीकरण होण्यांत जनार्दन शिक्रेंची कामगिरी त्यांच्या गोवा मुक्तिसंग्रामांतील कामगिरीपेक्षां कांकणभर जास्तच ठरणार आहे, अशी खात्री त्यांच्याबद्दल बाळगण्यास मुळींच हरकत नाहीं. म्हणूनच आज गोमंतकीय जनतेनें केलेल्या गोड, कृतज्ञ पण कांहींशा अपुऱ्या सत्कारापेक्षांही मोठा असा त्यांचा सत्कार महाराष्ट्रीय जनता भविष्यकाळांत केल्यावाचून राहणार नाहीं. जातां जातां जनार्दन शिक्रेंना एवढेंच सुचवायचे आहे कीं लक्करकोटला व अन्यत्र १९५५ सालीं जें भारतीयांनीं गोमंतक मुक्तीसाठीं आत्मबलिदान केलें, तेथें तेथें त्या हुतात्म्यांची स्मृति तेवत ठेवणारी स्मारकें अविलंबें होतील, याकडे त्यांनीं सक्रीय लक्ष द्यावें, आवाज उठवावा व सरकारला प्रत्यक्ष तें कार्य करावयास भाग पाडावें. त्यासाठीं व उद्याच्या गोव्याच्या महान् लढ्यासाठीं 'प्रदीप' अधिकाधिक प्रदीप्त होत राहो व 'प्रदीप'काराचा 'जीवनदीप' प्रदीर्घ तेवत राहो हीच 'दीपावली'ची इच्छा व हेंच 'दीपावली'तर्फें शिक्रेंचं अभीष्टचिंतन.

**—संपादक**








# प्रवाशांच्या आनंदांत भर घालणारी एस्. टी.

सर्वच गावें कांहीं रेल्वेच्या फाट्यावर किंवा बंदरावर वसलेली नसतात आणि तशी ती वसणें पण शक्य नाहीं. अशा परिस्थितींत दूरवरील खेडोपाड्यांत आंतील भागांपर्यंत प्रवास करावयाचा असेल तर तो एस्. टी. गाडींतूनच करावा लागतो. कारण एस्टीच्या हजारों मैल लांबीच्या मार्गाचें जाळें महाराष्ट्रांत वांद्यापासून चांद्यापर्यंत, मुंबईपासून नांदेडपर्यंत आणि धुळ्यापासून कोल्हापूरपर्यंत पसरलेलें आहे. एस्टीचा व्याप खेडोंपाडी पसरला असून महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतील खेड्यांत आपली गाडी पोहोंचविण्याचा एस्टीचा उद्देश आहे व त्याबाबतींत आतांपर्यंत समाधानकारक प्रगति झाली आहे. महाराष्ट्रांतील २/३ (दोन तृतियांश) खेड्यांना फारसें न चालतां एस्टीची गाडी मिळूं शकते.

जनतेच्या जीवनांत अनन्यसाधारण महत्व मिळविलेल्या व लोकजीवनाशीं एकरूप झालेल्या एस्टीची म्हणजेच महाराष्ट्र स्टेट रोड ट्रान्सपोर्ट कॉर्पोरेशनची स्थापना १९४९ च्या डिसेंबरांत झाली. १ जून १९४८ रोजीं पुणें — नगर मार्गावर अवघ्या ३५ गाड्यांनिशी उतारू वाहतुकीच्या राष्ट्रीयीकरणाची मुहूर्तमेढ झाली व सुमारें १६ वर्षांच्या अवधींत उतारू वाहतुकीच्या राष्ट्रीयीकरणाचे हें रोप फोफावत जाऊन त्यास विलक्षण बहर आला आणि हा वेल वाढत वाढत उदंड वाढला. त्याच्या कीर्तिसुमनांचा सुवास आतां सर्वत्र दरवळत आहे. आजच्या घटकेला एस्टी कॉर्पोरेशनच्या सुमारें ३,००० बस गाड्या असून महाराष्ट्रांतील ठिकठिकाणच्या २,४०० मार्गावर दररोज सुमारें ८ लक्ष उतारूंची इकडून तिकडे व तिकडून इकडे अशी अहोरात्र वाहतूक करण्याचे अतिशय महत्वाचें काम एस्टी बजावित आहे. केवढें हें प्रचंड कार्य! दररोज ८ लक्ष उतारूंची वाहतूक करावयाची म्हणजे एक मोठे शहरच्या शहरच वाहून नेण्यासारखें आहे. ३,००० बसगाड्यांचा ताफा सदैव सुस्थितींत रहावा व उतारू जनतेचा खोळंबा होऊं नये यासाठीं एस्टीच्या ११ विभागांतील ११ वर्कशॉप्स, ८६ डेपो आणि दापोडी येथील प्रचंड मध्यवर्ती वर्कशॉप नेहमीं कार्यमग्न असते. या सर्वामागें एस्टी कॉर्पोरेशनचे २१,००० सेवक प्रवासी जनतेच्या सेवेच्या कार्यांत रात्रंदिवस गुंतलेले असतात.

प्रवाशांचा प्रवास सुखाचा, आरामशीर व सुरक्षित आणि तोही वाजवी दरानें कसा होईल हा उतारू वाहतुकीच्या राष्ट्रीयीकरणाचा मुख्य हेतु. 'प्रवासी जनतेची सेवा' हेंच मुळीं एस्टीचे ब्रीद वाक्य. गेल्या १६ वर्षांत एस्टीनें उतारूंसाठीं काय केलें हें जर पहावयाचें असेल तर महाराष्ट्रांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारें त्याची साक्ष मूर्तिमंत उभी आहे. प्रवाशांच्या सोयीसाठीं अनेक महत्त्वाच्या ठिकाणीं एस्टीनें आतांपर्यंत कायम स्वरूपाचीं ५४ सुंदर व आलिशान बस स्टेशनें उभारली आहेत. प्रत्येक गावांतील बस स्टेशन म्हणजे त्या त्या गांवचे भूषणच होय. कांहीं ठिकाणीं १३५ तात्पुरती बस स्टेशनें असून खेड्यापाड्यांतून ३४८ निवाऱ्याच्या शेडस् उतारूंचे ऊन व पावसापासून संरक्षण करीत आहेत. उतारूंना सामान सुरक्षित ठेवतां यावें म्हणून ४३ क्लोक रूम बांधण्यांत आले आहेत. या खेरीज लांब पल्ल्याच्या गाड्या, सहलींसाठीं सुटणाऱ्या गाड्या, आराम गाड्या, विद्यार्थ्यांना शैक्षणिक सहलींकरितां सवलती, अंध उतारूंना सवलती, यात्रा व बाजारांकरितां जादा गाड्या, आगाऊ तिकिटाची सोय, स्वच्छ खाद्यपदार्थ व पेयें पुरविणारीं उपहारगृहें,



रुचिपालट म्हणून नवनवीन पदार्थ तयार करणें कोणत्याहि गृहिणीला मनापासून आवडते. एस्. टी. च्या कामगार कल्याण केंद्रांत पाकशास्त्राचीं प्रात्यक्षिकें वारंवार केलीं जातात. संसारदक्ष गृहिणी अशाच एका नवीन पदार्थाचें प्रात्यक्षिक एकाग्रतेनें बघत असतांना!

..तिगृहें, फळांची व पुस्तकांची दुकानें, सामान सुलभतेनें व सुखरूपपणें पाठविणारी पार्सल सर्व्हिस इ. इ. अनेकविध सुखसोयी पुरवून जनताजनार्दनाची सेवा करण्यांत सदैव प्रयत्नशील रहाणारी संस्था म्हणजेच एस्‌टी कॉर्पोरेशन.

प्रवासी जनता व कर्मचारी ही एस्‌टीच्या संसार गाड्यांचीं दोन चाकें आहेत. हीं दोन्हीं चाकें सदैव गतिमान राखली पाहिजेत. प्रवासी जनतेप्रमाणेंच कर्मचाऱ्यांना पण नानाविध सुखसोयी एस्‌टीनें पुरविल्या आहेत. कर्मचाऱ्यांच्या कार्यक्षमतेवरच एस्‌टीचें यश व कीर्ति अवलंबून असते. कामगार वर्गास योग्य तो सामाजिक व आर्थिक दर्जा प्राप्त करून देण्याकरितां व त्यांची सर्वांगीण उन्नति घडवून आणण्याच्या दृष्टीनें एस्‌टी अगदीं प्रारंभ कालापासून प्रयत्नशील आहे. एस्‌टींत सुमारें २१,००० कर्मचारी आहेत. त्यांच्या कल्याणकार्यासाठीं एस्‌टीच्या विभागांतून ६ कर्मचाऱ्यांच्या संस्था (स्टाफ इन्स्टिट्यूटस्), असून त्या आधुनिक सर्व सुखसोयींनीं सज्ज आहेत. कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांकरितां पण एस्‌टीच्या निरनिराळ्या विभागांतून ८ कल्याण केंद्रें असून तेथें भरतकाम, शिवणकाम, हस्तकलाव्यवसाय, पाकशास्त्र इ. नित्योपयोगी शिक्षण खास नेमलेल्या कल्याण शिक्षिकांमार्फत दिले जातें. कामगारांचे आरोग्य बिघडलें तर त्यास एरवीं बाजारांत महाग औषधें खरेदी करावी लागतात व औषधपाण्यावर पाण्यासारखा पैसा ओतावा लागतो. परंतु एस्‌टीनें कामगारांची ही अडचण ओळखून ठिकठिकाणीं ४६ दवाखाने उघडले आहेत. या दवाखान्यांत नाममात्र दरानें औषधें व इंजेक्शनें मिळतात. शिवाय एस्‌टीच्या ऑनररी डॉक्टरनें मान्य केल्यास, इतरत्र केलेल्या औषधपाण्याचा खर्च पण परत मिळण्याची सोय आहे. कामगारांना रहाण्याकरितां एस्‌टीनें ठिकठिकाणीं ६०५ गाळे बांधलेले आहेत. तसेंच ड्रायव्हर्स व कंडक्टर्स यांच्याकरितां एस्‌टीनें ठिकठिकाणीं ९६ विश्रांतीगृहें बांधलेली आहेत. या खेरीज कर्मचाऱ्यांच्या महागाई भत्त्याची संपूर्ण रक्कम मूळ पगारांत मिळवून कॉर्पोरेशननें १५० रुपयांपेक्षां कमी मूळ पगार मिळविणाऱ्यांना १० रुपये व १५० ते ५०० रुपयांपर्यंत मूळ पगार मिळविणाऱ्यांना २० रुपये महागाई भत्ता वाढ दि. १-४-१९६४ पासून दिली. त्याखेरीज दि. १-१-१९६४ पासून तृतीय व चतुर्थ श्रेणीतील नोकरवर्गाला दरमहा रु. १५ जादा महागाई भत्ता वाढ देण्यांत आली. याशिवाय दि. १ मे १९६४ पासून कर्मचाऱ्यांना आणखी ५ रुपये जादा वाढ दिली. अशा प्रकारें कर्मचाऱ्यांना एकूण २० रुपये जादा महागाई भत्ता वाढ मिळाली आहे. त्याचप्रमाणें दरमहा ६०० रुपयांपर्यंत पगार मिळविणाऱ्या द्वितीय श्रेणींतील एस्‌टी अधिकाऱ्यांना १-१-६४ पासून मासिक ३५ रुपयांची महागाई भत्ता वाढ देण्यांत आली आहे. महागाई भत्त्यांत वाढ केल्यामुळें एस्‌टी कॉर्पोरेशनला वार्षिक सुमारें ४० लाख जादा खर्च करावा लागतो. या शिवाय वर्षातून एक कर्मचाऱ्यांना कुटुंबाचा मोफत बसचा पास मिळतो. एस्‌टीतील ७५ टक्के नोकर जवळजवळ कायम करण्यांत आला आ... या व्यतिरिक्त कामगारांना मिळणाऱ्या इतरहि अनेक सवलती व सुखसोयी आहे... सारांश, एस्‌टी कर्मचाऱ्यांचा पगार व त्य... राहणीमान किती समाधानकारक आहे... कळून येईल.

रस्ता वाहतुकीकडे सामाजिक दृष्टी... पाहिल्यास लोकांना एकत्र आणण्य... आणि त्यांची नाती निकटवर्ती करण्य... रस्ता वाहतूक हें एक मोठें साधन आ... असें आढळून येते. मुंबई ते वेंती, मुंबई औरंगाबाद, मुंबई ते बीड, सोलापूर बुलढाणा, पुणें ते अमरावती, पुणें अकोला, पुणें ते जळगांव, औरंगाब... ते नागपूर इ. इ. महाराष्ट्रांत... निरनिराळ्या भागांना जोडणाऱ्या ल... पल्ल्याच्या गाड्या एस्‌टीनें सुरू कर... महाराष्ट्रांतील दळणवळण वाढविले अ... व महाराष्ट्राच्या भावनात्मक ऐक्य... हातभार लावला आहे. एस्‌टीची बस गा... केवळ माणसें व साहित्य यांचीच वाहत... करतें असें नव्हे तर ती शिक्षण, संस्कृ... राजकीय विचार, सामाजिक तत्त्वज्ञा... शास्त्रीय तत्त्वज्ञान इ. इ. नवनवोन्मे... शाली विचारधारांची पण वाहतूक कर... असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. बस गाडी सर्वांना समान पातळीवर आ... ण्याचें महत्कार्य पार पाडीत असून मह... राष्ट्रांतील एस्‌टीकडे पाहिल्यास आपण... असें दिसून येईल कीं जात, धर्म, भा... सामाजिक उच्चनीचता अथवा गरी... श्रीमंती हें भेद न मानतां एस्‌टीच्या गाड्या दररोज सुमारें ८ लाख उतारू... वाहतूक करतात. शहरांतील नवीन विच... रस्ता वाहतुकीद्वारा अंतर्भागांतील खेड्य... प्रवेश करतात व त्या नवीन विचारा... व राहणीचीं बीजें खेड्यांत रूजूं लागता... मूळ धरूं लागतात.

घरोघर आपल्या आप्त व प्रियजनां... वाहतूक करणाऱ्या एस्‌टीचें हे असें दि... आहे. ☆☆





एस्‌टीच्या कामगार कल्याण केंद्रामध्यें एसटीच्या कामगार वसाहतीमधील मुलांसाठीं मांटेसरी वर्ग.

